

दिवाळी अंक २०२२

येलम-रेड्डी फाऊंडेशन, पुणे द्वारा संचलित

# येलम विश्व




किंमत रु. ५०/-

## अंकाचे खास आकर्षण

माझा रशियाचा प्रवास

राम गोमारे यू आर एन आयर्नमॅन

UPSC तील यशाला गवसणी घालणारा प्रवास

आजोबा - एक लढावू बाण्याचे स्वातंत्र्य सैनिक

रेड्डी बचत गटामुळे समाजाची आत्मनिर्भरतेकडे वाटचाल





पुण्यातील आत्मनिर्भर रेड्डी (महिला व पुरुष) या दोन्ही बचत गटातर्फे आपले समाजबांधव व एक कर्तव्यदक्ष पोलीस अधिकारी राम (भैय्या) गोमारे यांनी अतिशय खडतर समजली जाणारी आयर्नमॅन कझाकस्तान ही स्पर्धा यशस्वीपणे पूर्ण करून आयर्नमॅन होण्याचा बहुमान मिळवला आहे, त्याबद्दल त्यांचा पुण्यातील पहिला सपत्नीक सत्कार समारंभाचा कार्यक्रम हॉटेल अतिथी थेरगाव, पिंपरी चिंचवड येथे आयोजित करण्यात आला होता तो क्षण.










**Nitin Shelke**
Director
Marketing Operations
Ph. 9423040888



**Adv. Datta Chewale**
Director
Legal & Land Acquisition
Ph. 9823722200



**Anup Shelke**
Director
Marketing Operations
Ph. 9923323999



**Ranjit Chamle**
Director
Finance
Ph. 7798885439

आदरणीय समाजबांधव,

सर्वप्रथम आपणास दिवाळीच्या हार्दिक शुभेच्छा.

साठवलेला पैसा योग्य ठिकाणी गुंतवणूक करण्यासाठी आपण सर्वजणच उत्सुक असतो तसं पहिलं तर गुंतवणुकीमध्ये सर्वात जास्त पटीने व वेगाने आपल्या पैशाला चालना देणारे मोठे क्षेत्र म्हणजे रिअल इस्टेट. पुण्यामध्ये आपले एक स्वतःचे घर, कमर्शिअल स्पेस किंवा प्लॉट असावे हे लातूरमधील प्रत्येक रहिवाशांचे / गुंतवणूकदारांचे स्वप्न असते व ते स्वप्न सत्यात उतरवण्यासाठी आम्ही लातूरकरांसाठी 'Quaternity Realty' ही हक्काची कंपनी सुरू केली आहे.

ह्या कंपनीचा मूळ उद्देश हा रिअल इस्टेट क्षेत्रामध्ये वेगवेगळ्या ठिकाणी परंतु प्रामुख्याने पुणे येथे रहिवासी / कमर्शिअल / प्लॉटिंग च्या माध्यमातून किफायतशीर गुंतवणुकीचे पर्याय आपल्या समाजासोबत तसेच समाजाशी संलग्न असलेल्या इतर लातूरकरांना उपलब्ध करून देणे हा आहे.

ह्याच उद्दिष्टास अनुसरून आम्ही Quaternity Realty च्या माध्यमातून सिंहगड रोडवरील आनंद नगर येथे जवळपास 2.5 एकर मध्ये 5 लाख चौरस फुटाचे बांधकाम असणारा 400+ फ्लॅट्सचा पहिला रहिवासी प्रोजेक्ट राणावत बिल्डर सोबत लॉन्च केला आहे. या प्रोजेक्ट च्या माध्यमातून आपण समाजासोबत आपल्या समाजातील समाजबांधवाशी संबंधित इतर समाजातील लातूरमधील जवळपास 28 गुंतवणूकदारांना अत्यंत अल्प दरामध्ये निवासी फ्लॅट तसेच गुंतवणूकीचा लाभ मिळवून दिला आहे.

तसेच लोहेगाव येथे डी.वाय पाटील कॉलेजच्या समोर आपला दूसरा जवळपास 250 रहिवासी फ्लॅट्सचा प्रोजेक्ट Dale Kon Builders सोबत संयुक्तरित्या सुरू केला आहे, यामध्ये लातूरमधील जवळपास 45 गुंतवणूकदारांना अत्यंत अल्प दरामध्ये आपण निवासी फ्लॅट उपलब्ध करून दिले आहेत. विशेष म्हणजे, कंपनीचे डायरेक्टर्स हे विविध क्षेत्रात मोठा अनुभव असलेले यशस्वी व्यक्तिमत्त्व आहेत. त्यामुळेच आतापर्यंतच्या वाटचालीत कंपनीला याचा चांगला फायदा झाला आहे.

---

Quaternity Group प्रति गुंतवणूकदारांचा विश्वास, हीच आमच्या यशस्वी प्रकल्पांची गुरुकिल्ली आहे. आमची पारदर्शक धोरणे व आजपर्यंत मिळवलेली विश्वासार्हता या बळावर आमच्या भविष्यातील प्रकल्पांमध्ये समाजातील व लातूरमधील अनेक गुंतवणूकदारांना व रहिवाश्यांना जोडण्याचा कंपनीचा मानस तसेच धैय्य आहे.

---



## संपादकीय...

सर्वप्रथम ''येलम विश्व'' च्या सर्व वाचक बांधवांना दीपावलीच्या स्नेहपूर्वक हार्दिक शुभेच्छा.

दिवाळीच्या सुट्टीत फफराळासोबत आम्ही खास तुमच्यासाठी ह्या अंकाच्या माध्यमातून बौद्धिक खुराक घेऊन आलो आहोत. आम्हाला विश्वास आहे कि, हा समाजासाठी समर्पित उपक्रम तुम्हाला नक्कीच आवडेल. पहिला दिवाळी अंक तुमच्या हातात देताना आम्हाला मनस्वी खूप आनंद होत आहे.

दिवाळी अंकाचा मुख्य उद्देश म्हणजे, लेखन व वाचनाची परंपरा निरंतर सुरु राहण्यास चालना मिळावी, समाज बांधव लिहिण्यासाठी प्रेरित व्हावे. समाजात घडत असलेल्या दखलपात्र घडामोडी समाजापर्यंत पोचवणे, विविध क्षेत्रात चांगली कामगिरी करत असलेल्या व्यक्तिमत्त्वांचा समाज बांधवांना परिचय करून देणे, समाजात कार्यरत असलेल्या व्यक्तींचे / संस्थांचे काम समाज बांधवांपर्यंत पोचवणे. महत्वाचं म्हणजे, अधिकाधिक समाज जोडण्याचं काम करणे हा यामागचा उद्देश आहे.

अंकात आम्ही आपल्या समाजातील समाज बांधवांनी लिहिलेल्या निवडक लेखांचा समावेश केला आहे. तसेच समाजात विशिष्ठ उद्देश घेवून कार्यरत असलेल्या संस्थांच्या उभारणीची माहिती देणारे लेख घेतले आहेत. लॉकडाऊनच्या काळात सुरू झालेल्या येलम-रेड्डी फफाऊंडेशनची सुरुवात आणि आत्तापर्यंत त्यांनी केलेल्या समाजकार्याचा आढावा घेण्यात आला आहे. तसेच समाजातील काही बांधव अंतरराष्ट्रीय स्तरावर समाजाचं नाव आपल्या कामगिरीतून झळकावत आहेत त्यांचे प्रेरणादाई लेख अंकात आहेत. सोबतच सामान्य कुटुंबातून येवून णझडउ सारखी अवघड परीक्षा पास होवून शासकीय सेवेत उच्च पदावर कार्यरत असलेल्या कृष्णा बदीमे यांच्या प्रेरणादायी प्रवासावर आधारित लेख आहे. विशेष म्हणजे, आपल्या समाजातील अनेक बांधवांनी मराठवाडा मुक्तीसंग्रामात मोठं योगदान दिलं आहे, अशाच एका आज-ोबांची त्यांनी रझाकारांना सळो की पळो करून सोडलेली कहाणी त्यांच्या नातूने अंकासाठी शब्दबद्ध केली आहे. तसेच सामाजिक स्थित्यंतर आणि समुपदेशन ही काळाची गरज यावर शुभदा रेड्डी या आपल्या भगिनींने लेख लिहिला आहे.

तसेच रेड्डी बचत गटामुळे समाजाची आत्मनिर्भरतेकडे वाटचाल सुरु आहे याची माहिती देणाऱ्या एका विस्तृत लेखाचा यात समावेश आहे. तसेच आपला समाज काल आज आणि उद्या यावर शिवाहार (हरिभाऊ) मरे काका यांनी लेख लिहिला आहे. आपल्या समाजाच्या व्यावसायिक व राजकीय घोडदौडीत येणाऱ्या अडचणींचा लेखाजोखा संतोष पन्हाळे यांनी रोखठोक भाषेत मांडला आहे. सोबतच आणखी काही अर्थपूर्ण आणि विचार करायला भाग पाडणारे लेख तसेच कवि-तांचा यात समावेश आहे. हे सर्व वाचताना वाचकांना आपलं येलम विश्व विविध अंगाने किती समृद्ध आहे याची नक्कीच जाणीव होईल.

या अंकासाठी प्रत्यक्ष आणि अप्रत्यक्ष स्वरूपात अनेकांचे मोलाचे सहकार्य लाभले आहे. त्यात संपादकीय मंडळातील बांधवांनी वेळोवेळी महत्वाच्या सूचना दिल्या, लेख वाचून अमूल्य अभिप्राय दिले तसेच अंकाचे मुद्रितशोधन करण्याचे काम उत्स्फफूर्तपणे केले, त्यासाठी सर्वांचे खूप खूप आभार. तसेच जाहिरात मंडळातील सर्व समाज बांधवांनी हा पहिला अंक असल्यामुळे जाहिराती मिळवण्यासाठी अनंत अडचणी येत होत्या, परंतु हे काम त्यांनी झोकून देऊन केले त्यामुळे त्यांचे विशेष आभार. अनेक समाज बांधवांनी त्यांच्या व्यवसायाच्या जाहिराती या अंकात देऊन अंकास आर्थिक पाठबळ दिले त्याबद्दल त्या सर्वांचेच मनःपूर्वक आभार. ''येलम विश्व'' ची टीम तुम्हा सर्वांच्या कायम ऋणात राहील.

आपल्या समाजाला एक नवीन आदर्शवत ओळख मिळवून देण्यासाठी, समाजात तळागाळापर्यंत पोचण्यासाठी कुठलं-तरी एक माध्यम हवं होतं, ते माध्यम हा दिवाळी अंक ठरावा. या माध्यमातून समाजाला समाजाचा आरसा दाखवण्याचं काम निरंतरपणे सुरू राहणार आहे. विशेष म्हणजे आम्ही या अंकाची किंमत नाममात्र ठेवली आहे, कारण तो आपल्या सर्वसामान्य समाज बांधवांना घेणे शक्य व्हावे. शेवटी सर्वात महत्वाचं म्हणजे तुमच्या अमूल्य प्रतिक्रिया आम्हाला नक्की कळवा. तीच आमच्यासाठी मोठी ऊर्जा असेल.

जशी प्रकाशामुळे दूर सरते भिती अंधाराची
तशी ही दिवाळी ठरो सौख्य आणि समृद्धीची

शुभ दीपावली!



शिकुमार राम चन्नागिर,
संपादक

येलम-रेड्डी फाऊंडेशन संचलित

# येलम विश्व

दिवाळी विशेषांक | वर्ष १ ले | ऑक्टोबर २०२२ | पृष्ठ संख्या ८० | मूल्य रु. ५० /- फक्त

Date of issue

२० ऑक्टोबर २०२२

**संपादक :**

शिवकुमार चन्नागिरे

**सहयोगी संपादक मंडळ :**

शिवहार (हरिभाऊ) मरे, नागनाथ चन्नागिरे (सर), प्राचार्य डॉ शिवराज कुकाले, सूरज पगडे, प्रा.डॉ. माधव कांडणगिरे (सर), राम नरहारे, शशिकांत येदले, प्रा. विष्णु बानापुरे, बालाजी इंद्राळे, संतोष चेवले,

**जाहिरात मंडळ :**

विठ्ठल मरे, तुळशीराम (राजू) नरहारे, माधव कातपुरे, विजय गोमारे

**मुखपृष्ठ मांडणी :** समीर शेंडकर

व्यवस्थापक आणि अक्षररचना :

समीर शेंडकर ७५५८३५१३४३

**मुद्रित शोधन :**

प्रा.डॉ. माधव कांडणगिरे (सर)

नागनाथ चन्नागिरे (सर)

**येलम विश्व दिवाळी अंक २०२२**

संपर्क क्रमांक - ९१३०८२२५८८

८८३०७१७५१४

https://www.yellamreddyfoundation.com



## अनुक्रम

# YRF च्या सुरुवातीमुळे समाज बांधवांना मिळतोय मदतीचा आधार

'धैय्य प्रगतिशील समाजाचे' हा उद्देश आणि 'फक्त समाजकार्य' ही भावना मनात ठेवून, आपल्या समाजातील काही तरुण युवकांनी पुढे येवुन तसेच समाजातील अनुभवी लोकांचे मार्गदर्शन घेऊन समाजातील गरजूंना मदत करण्यासाठी, त्यांना सशक्त करण्यासाठी, सेवाभावातून येलम-रेड्डी फाउंडेशनची स्थापना केली आहे. कोरोना महामारीमुळे अनेकांचे अतोनात हाल होत होते. त्या काळात आपण केवळ हातावर हात ठेवून स्वस्थ बसून न राहता काही तरी केलं पाहिजे या भावनेने, समाजातील आहे रे वर्गाकडून, नाही रे वर्गाला मदत मिळवून देण्यासाठी, निस्वार्थ भावनेने या फाउंडेशनचे काम सुरु आहे.

आजतागायत आपल्या समाजात विविध उद्देशांना वाहून घेतलेल्या अनेक संस्था अनेक ठिकाणी कार्यरत आहेत. काही संस्थांच्या माध्यमातून चांगले कामही सुरु आहे. परंतु अनेक ठिकाणी चालणारी कामे म्हणावी तेवढी समाधानकारक नाहीत हे पाहून समाजाला कुठंतरी एका चांगल्या संस्थेची गरज आहे हे प्रखरतेने लक्षात आले आणि त्यातूनच येलम-रेड्डी फाउंडेशनचा विचार पुढे आला. त्यात प्रामुख्याने शिवहार मरे, माधव उगिले, नागनाथ चन्नागिरे, माधव कातपुरे, तुळशीराम (राजू) नरहारे, शिवकुमार चन्नागिरे, विजय गोमारे, श्रीकांत कोतवाड, रामकिसन मलवाडे, विठ्ठल मरे, अनिल अर्धवडे, सुदर्शन मामडगे, शंकर गुरमे, रवींद्र भंडारे, कृष्णा कोलपूके, सुरज पगडे, अभंग चन्नागिरे, सत्यवान शेळगे, विनोद गुरमे, माधव एचवाड, राहुल गोजमे, वसंत (काका) शिंगडे, डॉ. शिवराज कुकाले सर, बालाजी खंदाडे, चैतन्य इरलापल्ले, लक्ष्मण खंदाडे, नामदेव गुरमे, राम नरहारे, रविन्द्र भंडारे, संभाजी कोल्हे, विष्णुकांत रामचंद्र, शिंगडे प्रमोद, अमोल नवलगिरे, सुधीर चामले रेड्डी यासारख्या अनेक समाजबांधवांनी पुढे येऊन एक अशी संस्था काढावी जिथे फक्त समाजकार्य हि भावना राहील व त्या संस्थेत नाव, पद, पैसा, मोठेपणा याला कधीच कुठेलेही स्थान नसेल. स्थान असेल तर ते केवळ आणि केवळ सामान्य समाजबांधव तसेच समाजासाठी झटणाऱ्या सर्वसामान्य कार्यकर्त्यांना. या फाउंडेशन मध्ये कायम तेच सर्वेसर्वा असतील..तीच या फाउंडेशन ची वेगळी ओळख असेल, ह्या विचारातून येलम रेड्डी फाउंडेशनची स्थापना झाली आहे.

तसेच ह्या संस्थेची धर्मादाय आयुक्तालय पुणे येथे १५ डिसेंबर २०२० रोजी रीतसर नोंदणी करून नोंदणी प्रमाणपत्र मिळाले आहे. सोबतच सर्व व्यवहार पारदर्शकपणे पार पाडण्यासाठी पिंपळे सौदागर येथील एसबीआय च्या शाखेत संस्थेचे अधिकृत खातेही काढले आहेत. तेव्हापासून फाउंडेशन कडून केले जाणारे सर्व व्यवहार ह्या खात्यावरून होत आहेत

**YRF Group**

# असा सुरु झाला सामाजिक सेवेचा प्रवास...




सुरवातीपासूनच आपल्या या फाउंडेशनचे ध्येय आणि उद्देश सुस्पष्ट असल्याचे तसेच ज्या बांधवांनी हे काम मनावर घेतले आहे त्यांच्यावर पूर्ण विश्वास असल्याचे सर्वांना जाणवल्यामुळे समाज बांधवांनी या फाऊंडेशनला भरभरून प्रेम दिले तसाच प्रतिसाद दिला. सुरवातीच्या केवळ १२-१५ दिवसात संस्थेकडे पावणे दोन लाख रुपये देणगी स्वरूपात जमा झाले होते. जेव्हा उद्देश शुद्ध असतो तेव्हा मदत करणारे हात आपोआप समोर येत असतात. आणि सुरुवात झाली गरजू तसेच काही एका कारणाने अडचणीत आलेल्या समाज बांधवांना मदत करण्यासाठी.



अल्पावधीतच अनेक समाजबांधवांना फाउंडेशन ने फुल नाही तर फुलाची पाकळी स्वरूपात मदत करण्याचा पूर्ण प्रयत्न केला आहे. फाउंडेशन चे स्वयंसेवक स्वतः मैदानात उतरून अडचणीत आलेल्या बांधवांना मदत पोचवण्यासाठी त्यांना मानसिक आधार देण्यासाठी दवाखाने तसेच घरोघरी जात होते. कोरोना सारखी भयानक जीवघेणी महामारी असताना हे कार्यकर्ते आपल्या जीवाची पर्वा न करता इतर बांधवाना मदत करण्यासाठी धावत पळत होते. हे तेव्हाच होऊ शकतं, जेव्हा आपल्या समाजबांधवांच्या प्रति आपली नितांत बांधिलकी असते.त्यांच्यासाठी काहीतरी करावं वाटतं.

## कुटुंबाला मदत

हेर : येथील अभंग संग्राम गरुडे यांनी सततची नापिकी, वाढलेला कर्जाचा बोजा, मागच्या काही महिन्यांपासून सुरू असलेला दवाखान्याचा खर्च या विवंचनेतून आत्महत्या केली. त्यांच्या पश्चात त्यांच्या पत्नी, तीन अपत्य आहेत. त्यापैकी मुलगी दिव्यांग आहे. घरातील कर्ता व्यक्ती गेल्यामुळे अशा परिस्थतीत या कुटुंबावर मोठे संकट कोसळले. येलम-रेड्डी फाउंडेशनने पुढाकार घेऊन गरुडे कुटुंबाला २१ हजार रुपयांची मदत केली. यावेळी यलम रेड्डी फाउंडेशनचे शंकर गुरमे, नागनाथ गुरमे, गिरीधर गुरमे, भगत गुरमे, शशिकांत गुरडे उपस्थित होते.

फाउंडेशन कडून सुरु असलेल्या मदत कार्याची वर्तमानपत्राने घेतलेली दखल

आजतागायत फाउंडेशन कडून सव्वा लाख रुपयांपर्यंत मदत केली गेली आहे तसेच जिथं मानसिक आधाराची गरज आहे तिथं मानसिक आधार दिला आहे. जिथं कायदेविषयक सल्ल्याची गरज आहे तिथं तो मिळवून देण्याचा प्रयत्न केला आहे. संस्थेचे प्रामाणिक काम पाहून दररोज नव नवीन समाज बांधव फेसबुक, वेबसाईट तसेच व्हाट्स अँप च्या माध्यमातून फाउंडेशन शी जोडले जात आहेत. ही खूप चांगली बाब आहे.
















# टीम YRF - फाउंडेशन कडून समाजबांधवांना मदत हस्तांतरित करताना काढलेले फोटो

गरजूंची पूर्ण पडताळणी करून खऱ्या गरजूंना मदत करण्याचा प्रयत्न केला. हे कार्य करताना मानलेले शब्दरूपी आभार.

आज आपल्या फाउंडेशन कडून
पहिली मदत केली गेली...!

---

आपलेच एक समाजबांधव देवीदास बापुराव सारूळे, रा.कुंभारी हे सध्या पुण्यातील दीनानाथ मंगेशकर हॉस्पिटल मध्ये उपचार घेत आहेत. सध्या त्यांना मोठ्या वैद्यकीय खर्चास सामोरे जावे लागत आहे. हे आपल्यापैकी सर्वांना माहीत आहे..

आज आपल्या काही स्वयंसेवकांनी हॉस्पिटल मध्ये प्रत्यक्ष जावून त्यांना भेट दिली, सर्व माहिती घेतली, विचारपूस केली, त्यांना मानसिक आधार देण्याचा प्रयत्न केला. आणि, आपल्या येलम-रेड्डी फाउंडेशन कडून त्यांना ₹११,०००/- रुपये मदत देण्यात आली. याप्रसंगी फाउंडेशनचे स्वयंसेवक, उपस्थित होते. फाउंडेशनच्या वतीने सर्वांचे खूप-खूप आभार.

विश्वस्त मंडळ🙏
येलम-रेड्डी फाउंडेशन

आज आपल्या फाउंडेशनकडून
आणखीन एक मदत केली गेली....

---

जरासंध मारुती चपडे, रा. पेठ तालुका-लातूर येथील असून मोलमजुरी करून आपले जीवन जगत आहेत. यांचा आधार असणारा मुलगा काही वर्षापूर्वी अपघातामध्ये मरण पावला, या मुळे हे निराधार झाले. अशा हालाखीच्या परिस्थितीमध्ये मोलमजुरी करून जगत असताना आर्थिक परिस्थितींना खूप सामोरे जावे लागले.

आपल्या संस्थेकडून मिळालेली रक्कम ही त्यांच्यासाठी लाख-मोलाची व जगण्यास बळ देणारी ठरणार आहे. त्यासाठी त्यांनी आपल्या संस्थेचे मनापासून आभार मानले आहेत. येलम-रेड्डी फाउंडेशन कडून त्यांना ₹११,०००/- रुपये मदत देण्यात आली...

विश्वस्त मंडळ🙏
येलम-रेड्डी फाउंडेशन

समाजातील आपल्या एका भगिनीला
फाउंडेशनकडून छोटीशी मदत केली गेली.!

---

आपलेच एक समाजबांधव सुभाष भूमने यांचे काही दिवसांपूर्वी कोरोनामुळे दु:खद निधन झाले आहे. त्यांच्या माघारी त्यांच्या पत्नी अर्चना सुभाष भुमने तसेच दहा आणि बारा वर्षांची दोन मुलं असा कुटुंब परिवार आहे.

अर्चनाताई, सध्या आपल्या दोन मुलांसोबत दिवे,डोंबिवली मुंबई, येथे राहत आहेत. त्यांचा घरातील कमवता आधार हरवला आहे. त्यामुळे आज आपल्या फाउंडेशनच्या स्वयंसेवकानी प्रत्यक्ष घरी जावून ताईंना भेट दिली, त्यांना मानसिक आधार देण्याचा प्रयत्न केला. सोबतच त्यांना येलम-रेड्डी फाउंडेशनच्या वतीने 11,000/- रुपयांची छोटीसी मदत दिली गेली.

याप्रसंगी उपस्थित स्वयंसेवकांचे तसेच या कार्यात प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष मदत लाभलेल्या सर्वांचे फाउंडेशनच्या वतीने मन:पुर्वक आभार.

विश्वस्त मंडळ🙏
येलम-रेड्डी फाउंडेशन

येलम-रेड्डी फाउंडेशनकडून
आत्महत्याग्रस्त कुटुंबाला मदतीचा आधार...

---

हेर-तालुका उदगीर येथील अभंग संग्राम गरुडे यांनी सततची नापिकी, वाढलेला कर्जाचा बोजा, मागच्या काही महिन्यापासून सुरू असलेला दवाखान्याचा खर्च या विवंचनतेनुन स्वत:चे आयुष्य संपवून टाकले होते. त्यांच्या माघारी त्यांच्या पत्नी छाया संग्राम गरुडे तसेच तीन अपत्य असून दोन मुले व एक मुलगी दिव्यांग आहेत.

सदरील कुटुंबाच्या घरातील कर्ता व्यक्ती गेल्यामुळे अशा परिस्थतीत या कुटुंबावर हलाखीची बिकट परिस्थिती ओढवली आहे. त्यांना मदत करण्यासाठी, छोटासा आधार देण्यासाठी येलम-रेड्डी फाउंडेशनने पुढाकार घेऊन त्यांना २१,०००/- रुपयांची मदत केली आहे. गावकऱ्यांच्या उपस्थती मदतीचे चेक मिळाल्यानंतर या कुटुंबाने फाउंडेशनचे मनापासून आभार व्यक्त केले. तसेच याप्रसंगी उपस्थित असलेल्या फाऊंडेशनच्या स्वयंसेवकांनी या कुटूंबाला आर्थिक मदत देण्यासोबत मानसिक आधार दिला व इथून पुढेही या कुटूंबाला मदत करण्यासाठी फाउंडेशन सर्वोतोपरी प्रयत्नशील असेल असा आशावाद व्यक्त केला.

विश्वस्त मंडळ🙏
येलम-रेड्डी फाउंडेशन

पुढील काळात लॉन्ग टर्मसाठी फाउंडेशन कडून काही महत्वाचे पायलट प्रोजेक्ट सुरु केले जाणार आहेत. त्या माध्यमातून समाजात शाश्वत असं काम करण्याचा मानस आहे. त्या साठीची पूर्वतयारी सुरु आहे. स्वयंसेवक होऊन तुम्हीही या कामात फाउंडेशन सोबत जोडले जाऊ शकता. त्यासाठी, तसेच

फाउंडेशनकडून मदत मिळवण्यासाठी संपर्क करा - https://www.yellamreddyfoundation.com
स्वयंसेवकांचे संपर्क क्रमांक - ९१३०८२२५८८, ८१२७१३२३२३, ९९७५०२१०५५, ९९२२५४४४४४, ७९७२७००७०२



वाचन व लेखनाची आवड असलेले आपल्या समाजातील (नागनाथ (विलास) भरत चन्नागिरे व शिवकुमार राम चन्नागिरे) ह्या दोन बांधवांनी संत बाळासाहेब महाराज नांदगावकर यांचे चरित्ररूपी पुस्तक लिहिले आहे. त्याचे प्रकाशन त्यांचे मूळ गाव नांदगाव मध्ये ह.भ.प माधव महाराज शिवणीकर (सदस्य - विठ्ठल रुक्मिणी मंदिर समिती, पंढरपूर) यांच्या शुभहस्ते तसेच गावकरी व भजनी मंडळाच्या उपस्थितीत पार पडले तो अविस्मरणीय क्षण...

# चंद्रपूर जिल्ह्यातील जिवती तालुका आणि येलम-रेड्डी समाजाची सद्यस्थिती

महाराष्ट्र राज्यातील चंद्रपूर जिल्हा हा एक महत्त्वाचा जिल्हा म्हणून सर्वत्र परिचित आहे. जंगल, दगडी कोळशाच्या खाणी, सिमेंट उद्योग  तसेच आदिवासी बहुल जिल्हा म्हणून सर्वत्र ओळखला जातो. या जिल्ह्यात एकूण १५ तालुके आहेत. जिल्ह्यातील संपूर्ण तालुक्यांपैकी जिवती हा एक तालुका आहे. या तालुक्याची इतर तालुक्यांपेक्षा वेगळी वैशिष्ट्ये आहेत. जिल्ह्याच्या शेवटच्या टोकाला हा तालुका असून तालुक्याच्या दोन्ही बाजूस तेलंगाना राज्याच्या सीमा लागलेल्या आहेत. या तालुका आणि परिसरास पहाडी भाग म्हणून ओळखले जाते. या परिसरावर निसर्गाने सौंदर्याची मुक्त उधळण केली आहे. येथे उंचच उंच डोंगर, घनदाट जंगल, कडे कपारी, उंच उंच झाडे, वेली, विविध वनस्पती , वेगवेगळी जंगली प्राणी व पशु येथे आढळतात. श्रावण महिन्यात या भागात जणू काही आपण एखाद्या पर्यटन स्थळीच आलो आहोत. असे वाटते.




या तालुक्यातील मूळ आदिवासी वगळता इतर सर्व लोक मराठवाड्यातील विविध भागातून स्थलांतरित होऊन स्थायीक होऊन  इथे वास्तव्य करतात. १९६५ - ७० च्या काळात मराठवाड्यातील भीषण दुष्काळात हे लोक रोजगाराच्या शोधात येऊन इथे स्थायिक झाले. १९६५ च्या आधीपासून चंद्रपूरची आराध्य देवी माता महाकालीच्या दर्शनासाठी मराठवाड्यातील भाविक लोक देवीच्या दर्शनासाठी येत असत. तेही शेकडो किलोमीटर अंतर पायपीट करून. आजही तेवढ्याच भक्ती भावाने चैत्र पौर्णिमेला भाविक भक्त देवीच्या दर्शनाला येत असतात. दुष्काळाने बाधित मराठवाड्यातील अल्पभूधारक, शेतमजूर व भूमिहीन लोकांचे या काळात मोठे हाल झाले. म्हणून रोजगाराच्या शोधात असलेल्या या लोकांना देवीच्या दर्शनासाठी आल्यानंतर बल्लारपूर येथील पेपर मिलला बांबू कटाई मजुरांची आवश्यकता असल्याचे समजले. याचवेळी माणिकगड पहाडावरील म्हणजेच जिवती परिसरातील जंगलातील बांबू कटाईचे काम त्यांना मिळाले.

या लोकांनी पुढे आपल्या कुटुंबकबिल्यासहित पाडावर झोपडी बनवून बांबू कटाईच्या कामाला मजूर म्हणून सुरुवात केली. आपण मूळ गावी म्हणजे मराठवाड्यात परत गेलो तर आपले वाईट हाल होतील. असा विचार करून परत न जाता या लोकांनी पहाड परिसरात असलेल्या जंगली माळरान असलेल्या वन विभागाच्या जागेवरील जंगलतोड करून जागा मिळेल त्या ठिकाणी त्यांनी शेती योग्य जमीन करून शेती कसण्यास सुरुवात केली. व तेथेच स्थायिक झाले. यावेळी या लोकांनी अजून आपल्या गावी असलेल्या आप्तस्वकीय व नातेवाईकांनाही बोलावून घेतले. येथे वास्तव्य करताना येथील वन विभागाने त्यांच्या अनेकदा झोपड्या जाळून संसार उद्ध्वस्त करून त्यांना उठवून लावण्याचा प्रयत्न केला. पण या लोकांनी त्यांच्याशी सामना करत येथेच राहण्याचा व स्थायी होण्याचा कसून यशस्वी प्रयत्न केला. आणि आज ते येथे स्थायिक झालेले आहेत.

मराठवाड्यातून स्थलांतरित झालेल्या लोकांमध्ये नांदेड, लातूर, परभणी,हिंगोली व अन्य जिल्ह्यातील बहुसंख्य लोक आहेत. या लोकांमध्ये बंजारा, हटकर, वाणी (लिंगायत),मराठा, आंध, कोळी, गोलेवार,  येलम - रेड्डी, मुस्लिम, जंगम, महादेव कोळी, मातंग, महार, न्हावी, परीट, ब्राह्मण, कोमटी अशा विविध जातीची व धर्माची लोक येथे कामासाठी येऊन स्थायिक झाले. या लोकांमधील पहिल्या पिढीने अतोनात हाल अपेष्ठ सहन करत आपले जीवन व्यतीत केले. आज मात्र आनंदाने व गुण्यागोविंदाने  हे लोक इथे राहताना दिसतात. यातल्या अनेकांनी तर मोठी प्रगती केल्याची दिसून येते. संपूर्ण गावेच्या गावे  मराठवाड्यातून आलेल्या लोकांचीच येथे आहेत.

तालुक्याच्या एकूण लोकसंख्येच्या ९० टक्के लोक हे मराठवाड्यातीलच आहेत. या लोकांची बोलीभाषा, राहणीमान, रितीरिवाज व संस्कृती संपूर्ण मराठवाड्यातीलच आहे. म्हणून या परिसरात या तालुक्याला 'छोटा मराठवाडा' सुद्धा म्हणतात. महाराष्ट्राचे लोकनेते दिवंगत विलासरावजी देशमुख साहेब मुख्यमंत्री असताना आपल्या गावाकडील लोकांसाठी विशेष सोय म्हणून त्यांनी २००२ मध्ये त्यांच्यासाठी जिवती हा नवीन तालुका निर्माण करून दिला.

मराठवाड्यातून आलेल्या लोकांमध्ये येलम-रेड्डी समाजातील लोक सुद्धा येथे आले व येथेच स्थायिक झाले. अत्यल्प प्रमाणात हा समाज येथे वास्तव्य करत आहे. इथे असणाऱ्या लोकांमध्ये इंद्राळे, गुरमे, कासले, मलवाड, बडगीरे, मुसणे, गुणाले, येरनाळे, वंगवाड, पस्तापुरे, नलवाड, खटके, खंदाडे, चोले, कांडणगिरे, येचवाड, पेटे, येनगे, मरेवाड, मद्देवाड, मर्लापल्ले, याचावाड,  चामे, राचमले, सुरकुटे अशा वेगवेगळ्या आडनावांची जवळपास ५० कुटुंबे स्थायी वास्तव्य करतात.

पहाडावरील येलम-रेड्डी समाजातील लोकांनीही इतरांप्रमाणेच येथे वन विभागाच्या जंगली भागाची वृक्षतोड केली व ती जागा शेती योग्य करून शेती करू लागले. या जमिनीवर शेती करून आपला उदरनिर्वाह करू लागले. या शेतीच्याच भरोशावर त्यांनी आपली जमेल तशी प्रगती करण्याचा प्रयत्न केला. यातल्या पहिल्या पिढीला अत्यंत संघर्षमय जीवन जगावे लागले. या लोकांना शेतीचे आधाराशिवाय दुसरा कोणताच आधार नसल्याने, उपलब्ध आहे त्यातच त्यांनी आपलं विश्व फुलविण्याचा प्रयत्न केला. यावेळी इथे शिक्षणासह अनेक प्राथमिक सोयीसुविधांचा अभाव होता. हा अभावओळखून या समाजातील काही शिक्षण प्रेमी असलेल्यापैकी स्वर्गीय श्री बब्रुवानजी मुसणे , स्वर्गीय आनंद मुसणे यांच्यासह अन्य काही लोकांनी यांनी शाळा सुरू करून येथील मुलांना शिक्षणाची सोय उपलब्ध करून दिली. या शाळांमधून हजारो विद्यार्थी शिक्षण घेऊन विविध पदावर कार्यरत आहेत. याशिवाय अजून काही लोकांनी येथे शैक्षणिक कार्य केले. यात प्रामुख्याने स्वर्गीय श्री गोपाळराव पस्तापूरे गुरूजींनी उत्तमपणे ज्ञानदानाचे कार्य करत अनेकांचे जीवन उजळवले. समाजातील काही होतकरू लोकांनी व्यवसाय क्षेत्रात प्रगती करत आपले नाव कमावले आहे.

या तालुक्यातील राजकीय क्षेत्रातही येथील लोकांनी आपले कर्तृत्व दाखवले. याचे उदाहरण म्हणजे जिवती पंचायत समितीचे सभापती पद सौ. अश्विनी गुरमे यांनी भूषवित तालुक्यातील पहिल्या महिला सभापती होण्याचा मान मिळविला. या पदावर असताना त्यांनी अनेक समाजोपयोगी कार्य केले. मात्र या भागातील समाज बांधवांनी पाहिजे त्या प्रमाणात शैक्षणिक प्रगती केल्याचे दिसत नाही.  तरी परिस्थितीशी दोन हात करत शिक्षण घेऊन महत्त्वाच्या पदावर अत्यल्प लोक पोहोचली त्यात प्रा. डॉ. राजकुमार मुसणे, प्रा. डॉ. माधव कांडणगिरे यांनी व ईतर काही जणांनी शासकीय सेवेतील काही पदे पटकावीत घेतलेल्या शिक्षणाच्या आधारावर परिस्थितीवर विजय मिळवण्याचा प्रयत्न केला आहे. आजही बरेच जण शिक्षण घेऊन पुढे जाण्याचा प्रयत्न करत आहेत.

आपल्या स्वगावाहून ५०० किलोमीटर दूर परक्या भागात येऊन आपले समाजबांधव उत्तम जीवन जगण्यासाठी सतत प्रयत्न करत आहेत. मराठवाड्यातील सुज्ञ उच्चशिक्षित समाज बांधवांनी इकडील समाज बांधवास यथोचित सहकार्य व मार्गदर्शन केल्यास येथील बांधवांची प्रगती होण्यास मदत होईल. असे मला वाटते. एरवी पुणे, मुंबई व मराठवाड्यातील लोकांना चंद्रपूर जिल्हा म्हटल्याबरोबर खूप दूर व परका परिसर वाटतो. पण आपलेच समाज बांधव या पर ठिकाणी येऊन स्थायिक होऊन आपली प्रगती करण्यासाठी सतत प्रयत्न करत आहेत. हे मात्र नक्की.



डॉ. माधव धोंडीबा कांडणगिरे
(मराठी विभाग प्रमुख चिंतामणी महाविद्यालय,
घुग्घूस जिल्हा - चंद्रपूर मो. क्र. ९९२३३८२९५४

# RB STATIONERS

दिवे तेवत राहोत,
आम्ही तुमच्या आठवणीत सदैव राहो,
जोपर्यंत आहे आयुष्य हीच ईच्छा आहे आमची,
दिव्यांप्रमाणे उजळत राहो आयुष्य तुमचे.
दिवाळीच्या खूप खूप शुभेच्छा.




**SANJAY BHANUDAS KOMPLE**
**9763 71 3044**

STATIONERY
HOUSEKEEING MATERIAL
COMPUTER CONSUMABLE
ALL TYPE PRINTING
XEROX, JUMBO XEROX
rb_stationers@hotmail.com

Shop No. 9, Mhatoba Complex,
Opp. Birla Soft gate No. 1, Hinjewadi, Pune 411 057
Mob. : 9823751213

A to Z Office Solution in One Roof

# UPSC तील यशाला गवसणी घालणारा प्रवास




गाव तसं छोटंसं मात्र गावातील कृष्णा या मुलाने यश मिळवलं आभाळाएवढं... ही गोष्ट जिथून सुरु होते ती म्हणजे, लातूर जिल्ह्यातील दगडवाडी या छोट्याशा गावात श्रीराम नावाच्या शेतकऱ्याच्या घरी त्याच्या पाचव्या मुलीचे नाव ठेवण्याचा कार्यक्रम सुरु होता. तेव्हा त्यांच्या पाच बहिणी सुद्धा तेथे आल्या होत्या, त्यावेळी त्यातली एक बहीण म्हणाली, 'अरे श्रीरामा एकामागून एक अशा पाच पोरी झाल्या, तुझा वंश पुढे कोण चालवणार? आता पोरगं पाहिजे रे बाबा.' १९९० च्या काळात ग्रामीण भागात मुलं आणि मुली यात भेदभावाचे प्रमाण खूप जास्त होते. त्यामुळे हा सूर आळवला गेला असावा.चार एकर जमीन तीही कोरडवाहू, पाच बहिणी, पाच मुली या मोठ्या कुटुंबाच्या रहाटगाड्याखाली कृष्णाचे वडील आधीच दबले होते. हुंड्याच्या प्रथेला बळी पडत, कर्ज बाजारी होत, बहिर्णींचे त्यांनी लग्न केले. तरीही समाजाच्या अपेक्षेसाठी त्यांना मुलगा हवा होता. त्यांनी अखेर खंडोबाला नवस केला आणि नवसाचं बाळ १९९३ साली कृष्णा बदिमे च्या रूपाने जन्माला आलं.

कृष्णा एक वर्षाचा असताना त्याच्या मोठ्या बहिणीचे लग्न झाले. गावात नेहमीच भांडणे व्हायची त्यामुळे भीतीपोटी त्यांच्या वडिलांनी दोन वर्षाच्या कृष्णाला आपल्या मोठ्या मुलीच्या हवाली केले आणि सांगितले, 'पोरी या पोराच्या जीवाला धोका होईल तेव्हा लातूरला त्याचा तू नीट सांभाळ कर.' वडिलांची अज्ञा प्रमाण मानून या मुलीने आपल्या लहान्या भावाचा मुलासारखा स्वीकार केला.

अठरा वर्षाच्या सविता ताई आणि त्यांचा नवरा गुंडाजी गोमारे यांनी मन मोठं करून कृष्णाला लातूरला आणले. काही काळानंतर गुंडाजी गोमारे हे ज्या शाळेत काम करत होते, ती शाळा संस्थाचालकांनी विकल्याने त्यांना नोकरीवरून काढून टाकले गेले. परिस्थितीपुढे हात न टेकता त्यांनी लॉटरीचा व्यवसाय केला, पुस्तक भांडारात नोकरी केली. देव तारी त्याला कोण मारी, या उक्तीप्रमाणे गुणाजी यांनी स्वतःचे ज्ञानेश्वर विद्यालयासमोर गोमारे जनरल स्टोअर्स नावाने दुकान टाकले. हळूहळू परिस्थिती सुधारत गेली पण जेमतेमच होती.

कृष्णाचे प्राथमिक शिक्षण घराजवळील शाळेत झाले. झोपडपट्टीतील समाजासाठी राजश्री शाहू विद्यालयातर्फे यशवंत महाविद्यालय सुरू करण्यात आले होते त्यामुळे कृष्णाला पाचवीपासून त्या शाळेत प्रवेश मिळाला. छोट्या कृष्णाला आई-वडिलांचे कष्ट, दुष्काळ, कुटुंबाची हलाखीची परिस्थिती, अजून चार बहिर्णींचे लग्न, याची पुरेशी जाणीव होती. त्यामुळे तो स्वतः हुन सरांकडून पुस्तके घ्यायचा, वाचायचा, प्रश्न विचारायचा, शिक्षकांनी सुद्धा त्याला तेवढेच प्रोत्साहित केले. पुढे पुढे कृष्णाला अभ्यासाची गोडी लागली आणि तो वर्गात प्रथम यायला लागला. दहावीला त्याला ९१ टक्के गुण मिळाले आणि बारावी सायन्ससाठी राजश्री शाहू महाविद्यालय लातूर येथे प्रवेश मिळाला. ट्युशनला पैसे नव्हते,

त्यामुळे कृष्णा स्वतःच अभ्यास करायचा.



पाचवी ते बारावीपर्यंत मध्यान्हात जेवण करून, ६ किलोमीटर सायकल चालवित दुकानात भाऊजींचा जेवणाचा डबा पोहोचता करणे, ही त्याची रोजची जबाबदारी आणि त्यानंतर सायकलवर परत जाऊन शाळा करायचा. परत शाळा सुटल्यानंतर संध्याकाळी सहा ते दहा दुकानात काम करणे. रिकाम्या वेळात अभ्यासाची व जनरल नॉलेजची पुस्तके काढून तो वाचायचा, हाच त्याचा अभ्यास.

बारावीनंतर एसजीजीएस अभियांत्रिकी महाविद्यालय नांदेड येथे वस्त्रोद्योग अभियांत्रिकीला त्याला प्रवेश मिळाला. चारही वर्षे तो प्रत्येक सत्रात वर्गात पहिला आलेला. त्यामुळे सर्व प्राध्यापकांचा तो आवडता विद्यार्थी, मनमिळावू, बोलका, आदराने वागणारा. सांस्कृतिक कार्यक्रमात तो हिरीरीने भाग घ्यायचा. राष्ट्रीय स्तरावरील प्रज्ञा या कार्यक्रमाचा तो जनसंपर्क निर्देशक होता आणि अंतिम वर्षात असताना तो कॉलेजचा जनरल सेक्रेटरी सुध्धा होता.

एसजीजीएस महाविद्यालयातील जोशी सरांसोबत त्याने राष्ट्रीय परिषदेत कार्बन फूटप्रिंट वरती प्रबंध सादर केला होता. गोदा जल दिंडीत हिरिरीने सहभाग घेतला होता. तेव्हा पुण्याचे विश्वास येवले यांच्याशी संपर्क आला आणि यूपीएससी बद्दल त्याला माहिती मिळाली. त्याच काळात नांदेडचे जिल्हाधिकारी श्रीकर परदेशी यांची सुप्रशासनाची चर्चा सगळीकडे होती. त्यांनी वाळूमाफियांना सळो की पळो करून सोडले होते त्यामुळेच अवैध वाळू विक्रीवर नियंत्रण आले होते. कृष्णाला येथूनच प्रेरणा मिळाली. काहीतरी वेगळे करण्याची, लोकांमध्ये जाण्याची, नेतृत्व आणि काम करायचे तर यूपीएससी द्यायची हे ठरले आणि श्रीकर परदेशी यांना प्रेरणास्त्रोत मानून ध्येयनिश्चित झाले आणि त्या दिशेने प्रवास सुरू झाला.

वस्त्रोद्योग अभियांत्रिकीत टॉप राहून ९५.१० या गुणांकांने त्याचे इंजिनिअरिंग पूर्ण केले. अंतिम वर्षात असताना गेटची परीक्षा दिली आणि आयआयटी दिल्लीचा एमटेक साठी कॉल आला होता. रिलायन्स इंडस्ट्रीजमध्ये त्यांना नोकरी लागली होती, तेव्हा पोटापाण्याची सोय म्हणून नोकरीचा पर्याय त्यांनी निवडला. तेथे त्यांना पॅकेजिंग विभाग देण्यात आला. कृष्णा ला संशोधनाची खूप आवड असल्यामुळे संशोधन विभाग पाहिजे होता. त्यांनी विनंती केली, परंतु फायदा झाला नाही आणि शेवटी नोकरी सोडली. एका जर्मन कंपनीत चांगल्या पॅकेजची ऑडीटर म्हणून नोकरी लागली. पण कंपन्यांना त्यांच्या गरजेनुसार रिपोर्ट हवा असतो, तेव्हा बॉस त्यांना रिपोर्टमध्ये बदल करायला सांगायचा. खोटारडेपणा यांना

आवडत नव्हता, त्यामुळेच त्यांचे बॉस सोबत अनेक वेळेस खटके उडाले, नोकरी सोडली आणि आता यूपीएससीची गाठ बांधून ते बाहेर पडले.

आपल्या भाऊजीची कृष्णा ने परवानगी घेतली, त्यांचा सुद्धा आपल्या या मेव्हण्यावर पूर्ण विश्वास होता. जमापुंजी घेऊन कृष्णा दिल्लीला रवाना झाला आणि यूपीएससीच्या क्लास मध्ये प्रवेश घेतला. जनरल विषयाचे ट्युशन्स लावले, पण ऑप्शनल आणि इतर विषयांसाठी पैसे नसल्यामुळे त्यांनी स्वअभ्यास केला. त्यांच्या वरच्या मजल्यावर छोट्या रूममध्ये तीन मित्र राहायचे. २०१५ साली यांना महिना ५००० रुपये मेस व रूम भाड्याचे बजेट असायचे. इतर खर्चासाठी महिन्याला दोनशे तीनशे रुपये फक्त उरायचे. वातानुकूलित ग्रंथालयाचे दरमहा २००० रुपये भाडे घेत ते त्यांना परवडत नव्हते, तेव्हा जुने पाचशे रुपयांचे कुलर घेऊन दिल्लीच्या गर्मीत रूमवर एका कोपऱ्यात ते अभ्यास करायचे . दोन वर्षे बाहेर फिरणे, हॉटेलमध्ये खाणे अजिबात नव्हते कारण जवळ पैसे नव्हते. त्या काळात गुंडाजी गोमारे यांनी कृष्णाला आर्थिक पाठबळ दिले. दुसऱ्या प्रयत्नात २०१७ साली यूपीएससीचा निकाल लागला आणि कृष्णा सरांचा भारतात ७६९ वा क्रमांक आला आणि आयडीएएस (Indian defence accounts service) हे केडर मिळाले. येथे वायुदल, नौदल, भूदलांचे अर्थ नियोजन, मंजुरी या विभागाच्या हातात असते. दरवर्षी चार लक्ष करोड रुपयांचे बजेट असते. त्यात कृष्णा बदीमे सरांना असिस्टंट कंट्रोलर म्हणून प्रशासकीय सेवेची जबाबदारी मिळाली. भारत सरकारतर्फे त्यांना वॉशिंग्टन व न्यूयॉर्क येथे प्रशिक्षणासाठी पाठविण्यात आले होते.



कधी गावाबाहेर न पडलेले, काबाडकष्ट करणारे आई-वडील, बहिण-भाऊजी सर्वांना लालबहादूर शास्त्री राष्ट्रीय प्रशासकीय अकादमी मसूरी उत्तराखंड येथे कृष्णा बदीमे सरांनी सर्वांना स्वखर्चाने तिथे बोलावले. त्यांना हरिद्वार, ऋषिकेश, हिमालयाचे दर्शन घडवून आणले. कृष्णा सरांचे आई-वडील श्रीराम व कमलबाई यांना आपल्या मुलाची प्रगती पाहून खूप आनंद झाला आणि आपल्या आयुष्याचे फलित झाले असे गंगा नदीचे दर्शन घेतल्यावर त्यांना मनोमन वाटले.

कृष्णा सरांची उत्तरोत्तर हिमालयासारखी प्रगती व्हावी यासाठी या सगळ्यांनी गंगेकडे प्रार्थना केली असावी. उत्तर भारतातील सुवर्णमंदिर, वाघा बॉर्डर असे सर्व स्थळांचे त्यांना दर्शन घडवून आणले. शेवटी आयुष्यभर शेतात कष्ट करत राहिलेल्या वडिलाला आता तुम्ही घरी आराम करा असे सांगितले. नंतर त्यांनी आपल्या शेतात गडी ठेवला, विहीर खोदली आणि शेती बागायती केली, त्यांच्यासाठी घराचे बांधकाम सुरू केले.



कृष्णा सरांचा UPSC चा हा प्रवास सोपा नक्कीच नव्हता. सुरुवातीपासून त्यांचं धैय्य स्पष्ट होतं. त्यांनी मेहनत घेतली त्याचं त्यांना यथोचित फळ मिळालं. आज देशस्तरावर कृष्णा सर एका जबाबदारीच्या उच्च पदावर कार्यरत आहेत. प्रशासकीय सेवेत आपला एक समाज बांधव मोठं योगदान देत असल्याचा आपल्या सर्वांनाच सार्थ अभिमान आहे. कृष्णा सरांकडे पाहून प्रशासनात उच्च पदावर येण्याची आज अनेकांना प्रेरणा मिळत आहे. त्याच प्रेरणेतून नजीकच्या काळात आपले अनेक समाज बांधव प्रशासकीय सेवेत रुजू होताना पाहून आपल्याला नक्कीच आनंद होईल.

**शब्दांकन - शिवकुमार चन्नागिरे**

# YCC - समाजातील तरुणांसाठी एक हक्काचं फोरम


दीपप्रज्वलन करताना टिपलेला क्षण..

२०१५ चे वर्ष, आळंदीतील समाजबांधवांच्या मीटिंगमध्ये काही युवकांनी कोण्यातरी एखाद्या माध्यमातून आपण सर्वांनी एकत्रित यावे, या उद्देशाने क्रिकेट हा खेळ निवडला आणि पुणे विद्यापीठातील ग्राउंडवर क्रिकेट खेळण्यास सुरुवात झाली. सुरुवातीला २०-३० युवक जोडले गेले. फेसबुकच्या माध्यमातून प्रॅक्टिस सेशनची माहिती पुण्यातील अनेक युवकांपर्यंत पोहोचायला लागली आणि अधिकाधिक युवक खेळाच्या माध्यमातून जोडले जावू लागले. बघता-बघता पहिल्याच वर्षी तब्बल ६० ते ७० युवक जोडले गेले आणि क्रिकेटच्या टूर्नामेंटची संकल्पना पुढे आली.

मग लागलीच टूर्नामेंट घेण्याच्या उद्देशाने हालचाली सुरू झाल्या. तसेच या क्रिकेट क्लबचे नाव ठेवण्याचे ठरले. सुरुवातीला अनेकांनी रेड्डी क्रिकेट क्लब असे नाव सुचवले. पण आपल्यातीलच काही युवकांना वाटू लागले की, आपण स्वाभिमानाने येलम हे नाव कुठेच घेत नाही आणि रेड्डी हे नाव आपण सर्रास वापरतो. आपण आपल्या जातीचा अभिमान बाळगला पाहिजे, असे आतून वाटू लागले आणि म्हणूनच मग येलम क्रिकेट क्लब म्हणजेच YCC हे क्लबचे नाव ठरले. सोबतच **Connecting through Spirit of game** हे ब्रीदवाक्य YCC या नावासोबत जोडले गेले.

सन २०१५ साली YCC चे पहिले टूर्नामेंट पार पडले आणि टूर्नामेंट दरम्यान संक्रांतीचे आयोजन करून अनेक परिवारांना या टूर्नामेंटशी जोडले. पहिल्या वर्षीचा अनुभव आणि एकंदरीत टूर्नामेंट प्रति सर्वांचे आकर्षण आणि प्रतिसाद हे पाहून या माध्यमाची खरी ताकद सर्वांच्या लक्षात आली..


तिकोना फोर्ट फॅमिली ट्रेक

आपले अनेक युवक मारवाडी / जैन मित्रांच्या सहवासात असल्यामुळे त्यांच्या समाजातील व्यवस्था कशा चालतात आणि त्यासाठी काय करण्याची गरज आहे हा नेहमीच कुतूहलाचा विषय राहिला आहे आणि तसे काहीतरी आपल्या समाजात व्हावे असे नेहमी वाटते. जैन/मारवाडी समाजात असे अनेक फोरम आहेत, जे त्या माध्यमातून नेहमी नवनवीन उपक्रम त्यांच्या समाजात घेत असतात. आपल्या पैकी अनेकजण मॅनेजमेंट शाखेचे विद्यार्थी असल्यामुळे अनेकांना वाटत होतं की, अशा प्रकारचे फोरम आपल्या समाजामध्ये ही असावे...




**YCC** च्या माध्यमातून आपण खूप काही साध्य करू शकू हे दिसून आले. कुठलीही व्यवस्था निरंतर चालू ठेवायची असेल तर त्याला योग्य अर्थकारणाची योग्य जोड देणे अत्यंत महत्त्वाचे. म्हणूनच पुढच्याच वर्षी याला कमर्शियल आणि प्रोफेशनल रूप देण्याच्या दिशेने काम चालू झाले. दुसऱ्याच वर्षी आयपीएल सारखे फ्रँचाईज कन्सेप्टचे अनुकरण केले आणि त्याला प्रतिसाद ही तसाच जोरदार मिळाला.

फ्रँचाईज मॉडिल च्या माध्यमातून येलम समाजातील उद्योजकांना समाजापर्यंत पोचवणे व युवकांना प्रेरणा मिळावी तसेच त्यांना नोकरीसाठी मदत व्हावी ही सामाजिक मुख्य भावना होती आणि आजही आहे.

२०१५ मध्ये ६ टीम, २०१६ मध्ये ८ टीम, २०१७ मध्ये १० टीम, २०१८ पासून १२ टीम ही **YCC** ची ग्रोथ स्टोरी आहे. प्रत्येक वर्षी नव नवीन संकल्पनांना वाव देत आपण टूर्नामेंटला जास्तीत जास्त आकर्षक कसे करता येईल हेच पाहिले आहे.

**YCC** च्या यशाचे मूळ कारण म्हणजे येथे काम करणाऱ्या स्वयंसेवकांचा फोरम च्या प्रति निस्वार्थ भाव आणि खेळाडूंचा त्यांना तितकाच प्रतिसाद देणे हे आहे. आज हे फोरम पुण्यातील युवकांच्या आयुष्यातील अविभाज्य घटक बनला आहे. यामुळे क्रिकेट या खेळाच्या माध्यमातून दरवर्षी नवीन समाजबांधव जोडले जात आहेत. जिवाभावाचे मित्र ह्या प्लॅट फॉर्म च्या माध्यमातून मिळत आहेत. खेळाचा आनंद घेत हे सगळे एकमेकांच्या सुख दुःखात सोबत राहत आहेत. तसेच नौकरी आणि व्यवसायासाठी अनेकांना मदत मिळत आहे. समाज बांधव राहत कुठेही असले तरी खेळाच्या माध्यमातून एकमेकांना भेटत आहेत. जसं सर्वजण **YCC** वर भरभरून प्रेम करत आहेत अगदी तसंच **YCC** या सर्वांच्या आयुष्यात अविस्मरणीय क्षण निर्माण करण्याचे काम करत आहे.


YCC - ओपनिंग सेरीमनी


टीम स्पॉनसर्स आणि फूड स्पॉनसर्स सोबत...

सर्वांना एकमेकांसोबत जोडून आज सर्वच एकमेकांसोबत मदतीच्या भावनेने एकत्र येत आहेत. YCC च्या माध्यमातून तब्बल ४०० ते ५०० येलम-रेड्डी युवक व त्याही पेक्षा जास्त परिवार आजपर्यंत जोडले गेले आहेत. तसं पहिले पाच वर्ष म्हणजेच २०२० पर्यंत फोरम मध्ये फक्त पुण्यामधील युवकांनाच भाग घेता येत असे पण उत्तरोत्तर YCC प्रती आकर्षण हे वाढू लागले आणि इतर शहरांमधून व त्यातल्या त्यात आपल्या लातूर मधील अनेक युवक यामध्ये येण्यासाठी उत्सुकता दाखवू लागले. त्यात जास्तीत जास्त समाज बांधवांना आपल्याशी जोडण्यासाठी YCC ने २०२० पासून सर्वांसाठीच सभासदत्व खुले केले.

आता इतर शहरातील तसेच गावातील युवक ही वायसीसी सोबत जोडले जात आहेत. इथे येऊन येथील खेळीमेळीचे वातावरण पाहून टुरनामेंटच्या काळात शनिवार/रविवार कित्येक मुलं गावाकडून पुण्याला YCC मध्ये सहभागी होण्यासाठी ये जा करतात. त्यांची प्रवासात धावपळ ही होते मात्र खेळाची प्रचंड आवड आणि इथे तयार झालेले जिवाभावाचे मित्र त्यांच्या सोबत घालवायला मिळणारा अतिशय सुंदर वेळ यामुळे हे YCCian टुरनामेंटच्या काळात आवर्जून उपस्थित राहतात. ही सर्वांसाठी खूपच आनंददायी गोष्ट आहे. आज YCC मुळे तुम्ही कुठेही जा, त्याठिकाणी तुम्हाला दुसरा YCCian भेटल्या शिवाय राहणार नाही. एवढा सर्वदूर आपला YCC परिवार पसरला आहे. सर्वांना सामावून घेणारा फोरम अशी ओळख निर्माण झाली आहे. तसेच मूलभूत उद्देशांना धरून फोरम आपली वाटचाल पुढे करत राहील आणि असाच प्रतिसाद स्वयंसेवक, खेळाडू तसेच स्पॉन्सरकडून भेटत राहावा व फोरमने दिवसेंदिवस एक नवीन उच्चांक गाठावा हेच प्रत्येक YCCian चे स्वप्न आहे.


YCC प्लेअर्स ऑक्शन सेरीमनी

YCC - स्वयंसेवक
येलम क्रिकेट क्लब

# असे घडवावे राष्ट्राचे भविष्यातील आधारस्तंभ

सर्वसाधारणपणे राष्ट्राचा भविष्यातील आधारस्तंभ म्हणून आजच्या बालकांचा उल्लेख आपण करीत असतो. ग्रामीण, गिरी अशा कोणत्याही समुदायातील बालक असोत. भविष्यातील राष्ट्र सुदृढ, विकसित गुणसंपन्न असण्याकरिता आजच्या बालकांवर वेळीच योग्य संस्कार होणे ही काळाची गरज होय. प्रत्येक कुटुंब, पालक यांच्याद्वारे वेळेचे भान ठेवून योग्य वयात जर बालकांवर संस्कार करण्यात आले तर किंबहुना अनियंत्रित बालक, गुन्हेगार बालक यासारख्या सामाजिक समस्येवरही प्रतिबंध होवू शकतो. 'शुद्ध बीजापोटी, फळे रसाळ गोमटी'' या उक्तीप्रमाणे संस्काररुपी विचार बालकांमध्ये रुजविण्याची पात्रता व कला सर्व पालकांना अवगत असावी जेणेकरून एक विकसित गुणसंपन्न व्यक्तीमत्त्व घडविले जाऊ शकते.



मुलांच्या समृद्ध जीवनासाठी पालकांची संस्कारात्मक भूमिका अतिशय महत्त्वपूर्ण असते. कारण बालकांच्या जडणघडणीत प्रथमत: पालक व नंतर भावंडे, शाळा, गुरूजन आदींचा प्रामुख्याने समावेश असतो. या ठिकाणी प्रथमत: पालक असा उल्लेख आहे. 'कारण ज्यात आई व वडील यांचा विशेषत: समावेश करावासा वाटतो, त्या अनुषंगाने पालक हा शब्दप्रयोग वापरला आहे.

बालकाची पहिली शिक्षिका म्हणून 'आई' या व्यक्तीमत्वाला संबोधिले जाते. मुलांचा जन्म व त्यांच्या व्यक्तीमत्वाची जडणघडण यात आईची प्रमुख भूमिका असते, हे शतकानुशतके आपण पाहतो आहे. मातृत्वाची विशेष नैसर्गिक देण स्त्रीला लाभलेली आहे. म्हणूनच आपल्या भारतीय संस्कृतीत 'मातृ देवो भव' असा उल्लेख केला जातो. या संदर्भात इतिहासकालीन सर्वपरिचित उदाहरण म्हणजेच छत्रपती शिवाजी महाराज यांच्या जीवन नौकेत मात्ररूपी संस्काराचे शीड उभे होते. ज्याद्वारे जिजामातांनी एक शिवबा घडविला.

ज्ञानरुपी संस्कारातून बालकांच्या योग्य जडणघडणीला आकार देता येतो. म्हणूनच 'शिकलेली आई व कुटुंबास पुढे नेई' असा शब्द उल्लेख समाजात प्रचलित आहे. दुसऱ्या बाजूचा विचार करता बालकांच्या संस्कारात मातेप्रमाणेच पित्याचाही वाटा तेवढाच महत्त्वाचा ठरतो. याकरिता 'वेळ नाही' ही सबब टाळून पित्यानेही थोडाबहुत वेळ मुलांकरिता राखून ठेवला पाहिजे. मुलांच्या सवयीकडे लक्ष देणे, संस्कारक्षम वयात नैसर्गिकपणे काही बालकांना डोळे उघडझाप करणे, आठ्याकाढून बोलणे, खोटे बोलणे, लहान-सहान चोरी करणे यासारख्या सवयी जडू शकत. पालकांनी त्याला मारहाण न करता त्याची ती सवय दूर कशी होईल याचा संयमाने व विचारपूर्वक प्रयत्न करणे गरजेचे असते. कारण मारहाणीतून कदाचित उलट अशी सवय गंभीर होण्याची शक्यता असते.

चोरीसारख्या सवयी बाबत विचार केला तर, अगदी लहान मुलाना निसर्गतः असे वाटत असते की, एखादी गोष्ट आपली असो किवा नसो आपल्याला हवी असताना ती आपल्याला मिळायलाच पाहिजे. जस जसे मुले मोठी होतात तस तसे त्यांना दुसऱ्याच्या मालमत्ते बद्दल आदर राखायला शिकविणे ही पालकांची योग्य संस्कारात्मक भूमिका होय. उलट पाहता रस्त्यात पडलेलं आपलं नसलेलं नाण पालकांनी उचलून खिशात घातलेलं मुलांनी पाहिलं तर मुलेही तसेच शिकतात. कारण मुलांच्या निरीक्षणाचा कल पालकांच्या कृतीकडे असतो. यानुषंगाने 'मुले ही अनुकरणप्रिय' असतात. असे विचार बाल मानसशास्त्रज्ञ याकडून पुढे येतात. म्हणूनच वेळीच प्रामाणिकपणाचा आदर्श पालकांनी बोलण्यातून तसेच कृतीमधून घालून देणे महत्त्वाचे ठरते.



या व्यतिरिक्त योग्य संस्काराकरिता खालील बाबी पालकांनी लक्षात घेऊन कृती करणे योग्य ठरेल जसे -

- मुलांच्या वर्तन विषयक समस्या जाणून त्याकरिता प्रतिबंधक उपाय विचारपूर्वक आखणे.
- मुलांच्या समोर पती पत्नी संघर्ष व परस्परांचा अपमान टाळणे.
- धूम्रपान, मद्यपान यासारख्या सवयींना पालकांनी टाळणे.
- मुलांच्या शैक्षणिक विकासाकडे लक्ष पुरविणे.
- मुलांकडून पालकांनी अवास्तव अपेक्षा न ठेवणे.
- मुलांच्या मित्र परिवाराची ओळख पालकांना असणे.
- आदर्श व्यक्तीमत्त्वाची उभारणी मुलांच्या मनात निर्माण करून देणे.
- मुलांच्या कला कौशल्यातील कल ओळखणे.

अशा विविध प्राथमिक बाबींकडे लक्ष ठेवून पालकांच्याद्वारे बालकांची योग्य जडणघडण साधली जाऊ शकते. ज्याचा आपण योग्य संस्कार या संकल्पनेत समावेश करत असतो. ज्याद्वारे राष्ट्रातील ग्रामीण, नागरी आदिवासी अशा सर्व समुदायातून राष्ट्राचे भविष्यातील आधारस्तंभ विकसित स्वरूपाचे घडतील.

-



प्रा. डॉ. विद्याधर रेड्डी
(लेखक जवाहरलाल नेहरू समाजकार्य महाविद्यालय, सिडको,
नवीन नांदेड येथे समाजकार्य या विषयाचे प्राध्यापक म्हणून कार्यरत आहेत)
मो. क्र. ९९७०२६३४८०

# आजोबा - एक लढावू बाण्याचे स्वातंत्र्यसैनिक...


ताम्रपत्र

१५ ऑगस्ट १९४७ रोजी आपला भारत देश स्वतंत्र झाला, पण त्यावेळी संपूर्ण देश हा विविध संस्थानांमध्ये विखुरलेला होता. त्यावेळी अनेक संस्थाने स्वतंत्र भारतात विलीन झाली परंतु हैद्राबाद हे एक त्यास अपवाद होते, त्यामुळे ते संस्थान तेव्हा भारतात सामील झाले नाही. त्यावेळी या हैद्राबाद संस्थानावर जुलमी निजामाचे राज्य होते. निजामच्या राज्यातून मुक्त होऊन भारतीय संघराज्यात सामील होण्यासाठी स्वामी रामानंद तीर्थ यांच्या नेतृत्वाखाली मराठवाडा मुक्ती संग्रामाचा मोठा लढा सुरु झाला.

मुस्लिम संघटनांनी ''रझाकार'' नावाने स्वयंसेवकांची भरती सुरु केली होती. हेच रझाकार मराठवाड्यातील आपल्या जनतेवर प्रचंड अत्याचार करत सुटले होते. रझाकारांच्या या अत्याचाराविरोधात आपल्या मराठवाड्यातून सर्वात मोठा उठाव झाला. त्या उठावाला सर्वांचीच साथ मिळाली. निजामापासुन आपला मराठवाडा मुक्त करण्यासाठी मराठवाडा मुक्ती संग्रामाचा लढा सुरु झाला, मुक्ती संग्रामाचे वारे वाहू लागले यातुनच एक तरुण युवक प्रेरित झाला ज्याचा जन्म १९१५ च्या दशकात काजळ-हिप्परगा या गावी झाला होता त्यांचं नाव विश्वनाथ पांडुरंग आरदवाड, त्यावेळी आपला उस्मानाबाद हा जिल्हा होता, आजोबांच्या याच देशभक्तीच्या आवडीने ते मराठवाडा मुक्ती संग्रामात भाग घेण्यासाठी प्रेरीत झाले. पूर्वी आजोबा जे कुस्ती खेळायचे तसं ते मोठे देशभक्त होते. त्यामुळे त्यांनी मराठवाडा मुक्ती संग्रामात स्वतःहून उत्स्फूर्त सहभाग घेतला.



ताम्रपत्र

आजोबांनी आपल्या शौर्याने रझाकरांना अक्षरशः सळो की पळो करुन सोडले होते, त्यांनी किती तरी रझाकारांचा आपल्या तलवारीने असाच खात्मा केलेला आणि त्यांचे मृतदेह ते स्वतः नदीत नेहून टाकत असत. त्यासाठी त्यांना जेल भोगावी लागली आहे. तसेच ते जेल मध्ये असताना निझामाकडून त्यांना खूप त्रास देण्यात आलेला. त्यांना जेवायला दिली जाणारी जी भाकरी असायची त्यात सिमेंट मिक्स करून दिले जात असे. तरी कशाची ही पर्वा न करता त्यांनी खूप त्रास सहन केला. कारण त्यांचे धैय्य एकच होते ते म्हणजे, आपला मराठवाडा निजामाच्या जोखडातून मुक्त झाला पाहिजे.

माझे आजोबा सांगायचे की, आम्हाला त्यावेळी कुटुंब वगैरेचा कधीच विचार यायचा नाही की, आपल्या कुटुंबाला कुठे काही झालं तर त्यांचे कसे होणार हा विचारच दूर दूरपर्यंत नसायचा. देशभक्ती आणि निश्चित ध्येय समोर असल्यामुळे त्यांनी कधीही तडजोड केली नाही. तसं ते जे काही करत होते त्यासाठी कुटुंबातून त्यांना भरपूर विरोध होत होता पण त्यांनी कसलीही पर्वा केली नाही, या सर्व गोष्टींमध्ये बाकी सदस्यांचा त्यांना सहयोग असायचा म्हणून त्यांनी कशाचीही पर्व न बाळगता आपल्या धैय्यावर स्थिर राहिले. त्यावेळी आमची आज्जी कुटुंब सांभाळाची त्यामुळे त्यांना त्याची तशी फिकीर नव्हती.



कशाचा ही विचार न करता  हातात तलवार घेउन रझाकारांशी ते दोन हाथ करू लागले. आजोबा रझाकारांच्या विरोधात प्राण पणाला लावून लढले. आजोबांच्या पश्चात कुटुंबात अज्जी, ६ मुली, १ मुलगा व नातवंडे असा मोठा परिवार आहे. त्यांच्यासारखेच अनेक स्वातंत्र्य सैनिक मराठवाड्याच्या परिणामी देशाच्या कामाला आले. बघता बघता अशा हजारो तरुणाच्या लढ्याने आखेर निझामाचा खात्मा होऊन मराठवाडा निजामशाहीतुन अखेर मुक्त केला. अशा या आपल्या व अशाच हजारो स्वातंत्र्य सैनिकांचा येलम  समाजाला सार्थ अभिमान आहे व त्यांच्या समर्पित कार्याला व बलिदानाला मानाचा मुजरा..!

-



लहू आरदवाड
मो. क्र. ८८८८८६५८०९

# देशभक्ती



असावी देशभक्ती आतून आलेली,
ती नसावी कधीही प्रासंगिक...!

देशप्रेम तेव्हाच आतून येईल, जेव्हा
दिले जाईल शिक्षण, राष्ट्रभक्तीयुक्त..!

अती टोकाची भूमिका, कधीही ठरत नसे उचित
मध्यम मार्गच ठरेल, नेहमी शाश्वत...!

देशाप्रती प्रेम दिसले पाहिजे सदैव,
प्रत्येक कृतीत पाहिजे देशहित
केवळ औपचारिकता खूप झाली आता..!

उग्रवादी कारवायांमध्ये
स्थानिकांनी परकीयांना मदत करणे,
हा असे सर्वात मोठा देशद्रोह..
तो करणाऱ्यास व्हावे कडक शासन..!

सुरक्षा बलांमध्ये अंतर्गत सामंजस्य नसणे,
गुप्तचर यंत्रणांनी दिलेल्या सूचनांवर
प्रभावी अंमलबजावणी न होणे
ही मोठी धोक्याची घंटा
त्यामुळेच मिळत आहे यश
आणखी एका घातपाती कारवाईस..!

मीडिया, समाजमाध्यमे आणी
समाज माध्यमवीरांची असंवेदनशीलता
हा प्रश्न आहे मोठा गंभीर...तो सोडवावयास हवा
अधिक तत्पर आणी संवेदनशीलतेने..!

असावी देशभक्ती आतून आलेली,
ती नसावी कधीही प्रासंगिक....!



शिकुमार राम चन्नागिरे, पुणे.
(Channa Way)
मो. क्र. ९१३०८२२५८८

# ‘दिवा एक दिवाळीचा...’



दिवा पहिला दिवाळीचा,
देवतांचा दोन्ही स्वराज्याच्या.
देव ठेविले देवळात अनब,
शिखरे वरती राऊळाच्या.

दिवा दुसरा लावू दारी,
मातृत्वाचा जिजामातांच्या.
स्त्रीला शिक्षित करणाऱ्या,
पितृत्वाचा सावित्रीबाईच्या.

एक दिवा स्वातंत्र्यासाठी,
अर्पिलेल्या त्या बलिदानाचा.
एक दिवा देशाच्या सीमेवर,
लढणाऱ्या वीर जवानाचा.

एक दिवा दिनरात रानात,
राबणाऱ्या बळीराजाचा.
एक दिवा शेतकऱ्यांवर,
कृपा करणाऱ्या वरूणराजाचा.

एक दिवा वस्तू उपयोगी,
बनवणाऱ्या कारागिरांचा.
एक दिवा ग्राम सफाई,
करणाऱ्या कामगारांचा.

लावू दिवे आपल्या दारी,
करण्या उतराई सर्वांची.
पुजू मनोमनी सगळ्यांना,
फेकून झोळी गर्वाची.



कवी - श्री अजयकुमार व्यंकटराव वंगे (रेड्डी)
प्राथमिक शिक्षक, श्री बळवंतराव यादव मराठी शाखा, पेठवडगाव,
ता. हातकणंगले, कोल्हापूर ता.जि. लातूर
मो. क्र. ९९७५०७०५४९

# शेतकऱ्यांना समृद्ध करणारा शेतकरी उत्पादक कंपनी पॅटर्न

## ( Farmer Producer Company – FPC )

शेतकरी उत्पादक कंपनी म्हणजे शेतकरी बांधवांनी एकत्रित येवून कायदेशीर बाबी पूर्ण करून उभारलेली कंपनी होय. या कंपनीचे संचालक, सदस्य हे शेतकरी असतात तसेच कंपनीचे सर्व व्यवस्थापन सुद्धा शेतकरी बांधवाद्वारे करण्यात येते, शेतकरी उत्पादक कंपनी स्थापन करण्याकरिता कमीत कमी १० सदस्य असणे गरजेचे आहे. यामधील ५ संचालक तर ५ सदस्य म्हणून निवडावे लागतात. शेतकरी उत्पादक कंपनी ही कंपनी कायदा, १९५६ आणि २०१३ अंतर्गत स्थापन करण्यात येते.

शेतकरी उत्पादक कंपनी भारत देशातील कोणताही नागरिक ही कंपनी स्थापन करू शकतो. ज्या बांधवांना शेतकरी उत्पादक कंपनी सुरू करायची असेल त्याच्याकडे जमीन असणे गरजेचे आहे. स्वतः च्या नावावर ७/१२ असणे गरजेचे किंवा आपल्या आई वडिलांच्या नावाने ७/१२ असेल तरी चालतो.

शेतकरी उत्पादक कंपनी स्थापन करण्याकरिता ५ सदस्य आणि ५ संचालक असे एकूण १० शेतकरी बांधवाचे बेसिक डॉक्युमेंट लागतात. यामध्ये आधार कार्ड, पॅन कार्ड, ७/१२, शेतकरी प्रमाणपत्र, लाईट बिल, मागील दोन महिन्यांचे बँक स्टेटमेंट, ऑफिस पत्यासाठी लाईट बिल, पासपोर्ट फोटो, कंपनी नाव, संचालकांचे नाव आणि संपर्क क्रमांक इत्यादी माहिती सुद्धा आवश्यक असते.

शेतकरी उत्पादक कंपनी अनेक व्यवसाय सुरू करू शकते, जसे कि कृषी सेवा केंद्र, शासकीय शेतमाल खरेदी केंद्र, ग्रेडिंग आणि पॅकिंग हाऊस, कोल्ड स्टोरेज, पोल्ट्री फार्म, गोट फार्म, बीज उत्पादन कार्यक्रम, कृषी प्रक्रिया केंद्र, सेंद्रीय भाजीपाला, फळे विक्री केंद्र, दुग्ध व्यवसाय, दुग्ध संकलन केंद्र, पशू खाद्य विक्री केंद्र, शेतकरी प्रशिक्षण केंद्र, ॲग्रो मॉल, मशरूम निर्मिती, मत्स्य व्यवसाय, खेकडे पालन, करार शेती, खासगी किसान कॉल सेंटर, फुलशेती, मार्केटिंग एजन्सी, कृषी अवजारे बँक, रोपवाटीका इत्यादी.

अनेक व्यवसाय सर्व संमतीने कायद्याच्या चौकटीत राहून आपणास सुरू करता येतात. कंपनीची नोंदणी झाल्यावर पुढील ५ वर्ष कंपनीच्या नफ्यावर कोणताही कर लागत नाही. महाराष्ट्र शासन आणि केंद्र सरकारच्या अनेक योजना शेतकरी उत्पादक कंपनी साठी आहेत. बँक कर्ज मिळण्यास सुलभता प्राप्त होते. नाबार्ड कडून अनेक योजना किंवा प्रकल्पासाठी अनुदान उपलब्ध होतं तसेच कर्जावरील व्याज दर हा कमी असतो.

कंपनीच्या नफ्यावर मिळणाऱ्या लाभांशावर सर्व सदस्य शेतकरी बांधवांचा अधिकार असतो. कंपनी द्वारे मिळालेल्या सेवा, विक्री सुविधा यामुळे वेळेची बचत होऊन आर्थिक फायदा होतो. कृषी अवजारे वेळेवर आणि माफक दरात मिळतात. शेतमाल आयात निर्यात, कृषी प्रक्रिया केंद्र यामुळे रोजगार निर्मिती होऊन कायमस्वरूपी आपल्या गावात आपल्या माणसांना रोजगार प्राप्त होतो.

योग्य नियोजन, योग्य व्यवस्थापन, योग्य प्रशासन याची सांगड घालून ग्रामीण भागात मोठ्या प्रमाणात रोजगार संधी, आर्थिक चळवळ, आर्थिक सक्षमता आणण्याची क्षमता या शेतकरी उत्पादक कंपनी मध्ये आहे.

सहकार्यभाव आणि प्रयोगशीलतेला आधुनिक तंत्र-विज्ञानाची (Modern Agriculture Technology) प्रभावी जोड देत येलम-रेड्डी समाजातील शेतकरी उत्पादक कंपन्या गरुडझेप घेत आहेत.

येलम समाजातील शेतकरी उत्पादक कंपन्यांच्या अनेक यशोगाथा आहेत. आपल्या बांधवांच्या काही कार्यान्वित शेतकरी उत्पादक कंपन्या, त्यांचे व्यवसाय आणि पत्ता येथे नमूद करत आहे तरी तुम्ही सुद्धा भेट देऊन अधिक माहिती घेऊ शकता.

**ओम साई आधुनिक फार्मर प्रोड्युसर कंपनी लिमिटेड**, व्यवसाय - बीज उत्पादन कार्यक्रम, ग्रेडिंग आणि पॅकिंग आणि कृषी सेवा केंद्र. पत्ता - महाळंग्रा पाटी तालुका चाकूर जिल्हा लातूर.

**ॲग्रोटॅप प्रोड्युसर कंपनी लिमिटेड**, व्यवसाय - बीज उत्पादन कार्यक्रम, नाफफ़ेड हमीभाव खरेदी केंद्र आणि कृषी सेवा केंद्र. पत्ता - अष्टमोड तालुका चाकूर जिल्हा लातूर.

**आदिश्री फार्मर प्रोड्युसर कंपनी लिमिटेड**, व्यवसाय - नाफेड हमीभाव खरेदी केंद्र. पत्ता - नळेगाव तालुका चाकूर जिल्हा लातूर.

**रवींनी फार्मर प्रोड्युसर कंपनी लिमिटेड**, व्यवसाय - बीज उत्पादन कार्यक्रम, नाफेड हमीभाव खरेदी केंद्र. पत्ता - खरोळा तालुका रेणापूर जिल्हा लातूर.

ज्यांना कोणाला मार्गदर्शन किंवा याबाबतची अधिक माहिती हवी असेल किंवा कंपनी काढण्यासाठी आणखीन जे काही माहिती अथवा मदत आपल्या समाजातील बांधवाना लागत असेल तर त्यासाठी संपर्क करू शकता यातून आपला समाज आर्थिकदृष्ट्या सक्षम झाला पाहिजे नवीन पिढीने नोकरी करणाऱ्यांपेक्षा नोकरी देणारा झालं पाहिजे हेच उद्दिष्ट आहे.

चला तर मग एक नवीन विचाराचा व शेतकरी उत्पादक कंपन्या (Farmer Producer Company) चा येलम समाज पॅटर्न घडवूया, एकमेकांना सहकार्य करून नवीन पिढीसाठी भक्कम अशी एकजुटतेची आत्मविश्वासाची आणि उद्योगाच्या विचारसरणीची विरासत ठेवूया.

सर्वांना दिवाळीच्या हार्दिक शुभेच्छा!!!!!!!!!



शशिकांत येदले
मो. क्र. ९३५६८८४८४४

# म्हणून तो एक महात्मा होता



चारित्र्य शिवाय शिक्षण हे एक पातक आहे
असं तो सांगत होता
चारित्र्यसह शिक्षण हे जीवन शिक्षण आहे
असं तो मानत होता
म्हणून तो एक महात्मा होता//

तो केवळ शारीरिक पातळीवर जगणारा सामान्य माणूस नव्हता
तर तो त्यातील आत्म्याला ओळखणारा असामान्य सामान्य माणूस होता
म्हणून तो एक महात्मा होता//

केवळ सत्ता, संपत्ती व प्रतिष्ठा यांचीच साधना करण्या एवढा तो लहान नव्हता
तर तो सत्याची,सदगुणांची व त्यागाची साधना करणारा महान माणूस होता
म्हणून तो एक महात्मा होता//

त्याला भूतकाळाच भान होतं
वर्तमान काळाचे ज्ञान होतं
भविष्यकाळातलं विज्ञान तो समजत होता
म्हणून तो एक महात्मा होता//

त्याला केवळ दृष्टी नव्हती तर त्याच्या जगण्यात दूरदृष्टी होती
त्यासाठीच तो सगळ्यापेक्षा वेगळा ठरला होता
म्हणून तो एक महात्मा होता//

तो कमालीचा निर्भय होता
जगावर राज्य असणाऱ्या इंग्रजा विरुद्ध तो एकटाच उभा होता
म्हणून तो एक महात्मा होता//

जगात अनेक धर्म आहेत
पण सर्वधर्मांचे मर्म एकच आहे असं तो सांगत होता
म्हणून तो एक महात्मा होता//

दुसऱ्याच्या कल्याणात तो आपलं कल्याण
शोधत होता
त्यालाच तो सर्वोदय म्हणत होता
म्हणून तो एक महात्मा होता//

शारीरिक गरजांसाठी गाव हेच माझे विश्व मानीत होता
ज्ञानासाठी मात्र विश्व हेच माझं गाव सांगीत
होता
म्हणून तो एक महात्मा होता//

साधी राहणी व उच्च विचारसरणी हाच त्याच्या जगण्याचा मंत्र होता
पर्यावरणाचे रक्षण करा असं तो जगण्यातून सांगत होता
म्हणून तो एक महात्मा होता//

केवळ परकीयांच्या गुलामगिरीतून मुक्तता म्हणजे स्वातंत्र्य अस तो मानीत नव्हता
तर प्रत्येक माणसाची सर्व प्रकारच्या शोषणातून मुक्तता म्हणजे स्वातंत्र्य अस तो मानीत होता
म्हणून तो एक महात्मा होता//

मला लोक महात्मा म्हणतात म्हणून मला महात्मा म्हणू नका
माझे विचार, आचार तुमच्या बुद्धीच्या कसोटीवर घासून घ्या असं तो सांगत होता
म्हणून तो एक महात्मा होता//



भागवत येनगे, (शिक्षक)
अहमदपुर
मो. क्र. ९४०४५६०५४०

'माणुसकी हीच एक आमची जात'

**सर्वोदय बहुउद्देशीय सेवाभावी संस्था नांदगाव तर्फे समाज बांधवांना दीपावलीच्या हार्दिक शुभेच्छा.**



# शुभ दिपावली



**येलम - रेड्डी फाऊंडेशन पुणे द्वारा संचलित 'येलम विश्व' च्या पहिल्या दिवाळी अंकास हार्दिक शुभेच्छा**



**शुभेच्छुक - धनराज चन्नागिरे, अध्यक्ष**

# 'फ' फराळाचं

'चकली , चिवडा तेलात भिजून झाले चिंब
लाडवाच्या पाठीवर बेदाण्यंचा ठींब
वळून वळुन लाडवाना आलं गरगरुन
गोल गोल फिरून चकली थकली
तड्म तुडूम टकट तुडूम ऊडू लागले जिन्नस
तु  खरपूस कि मी ? दाण्याची खोबर्याला खुन्नस'

कविता वाचता वाचता आपल्या सगळ्यांच्या लहानपणीच्या दिवाळी आणि दिवाळी फराळाच्या आठवणी नक्कीच जाग्या झाल्या असणारं. दिवाळी आली की अश्या अनेक फराळाच्या बालकविता ऐकतो , वाचतो आणि आपण आपल्या बालपणीच्या आठवणीत रमून जातो. दिवाळी आणि दिवाळी फराळ ह्याचं नातं पण असंच अतूट आहे. फराळा शिवाय दिवाळी आणि दिवाळी शिवाय फराळ हे न जुळणारे समीकरण . काहीसा गोड , काहीसा तिखट आणि चमचमीत अश्या आपल्या फराळाची वैशिष्ट्य. दिवाळी सणामुळे जसं घराघरात आनंदाचं वातावरण निर्माण होत तसंच दिवाळीत आपण आपल्या नातेवाईकांना आणि पाहूणे ह्यांना फराळाच निमंत्रण देतो त्यामुळे नाती आणि सामाजिक जवळीक अजून वाढते.



**दिवाळी आणि फराळाची परंपरा:-**

दिवाळी आणि फराळाची परंपरा यांचा इतिहास फार जुना आहे. 'भोजनकुतूहल' ह्या प्राचीन ग्रंथामध्ये दिवाळीच्या फराळाचा उल्लेख केला गेला आहे. गुगल वर उपलब्ध असलेल्या माहितीनुसार हा ग्रंथ ११व्या शतकातला आहे. ह्यावरून आपण दिवाळी फराळाची परंपरा किती जूनी आहे हे लक्षात घेऊन शकतो. आपल्या मराठी ताटात असणारे किती तरी फराळाचे पदार्थ हे मूळचे महाराष्ट्रातील नाहीत , ते परप्रांतातून किंवा इतर देशांतून येऊन आपल्या मराठी फराळात रूजू झाले आहे. त्यातील काही फराळाची नाव आणि त्याचं मुळ प्रांत खालील प्रमाणे

| फराळाच नाव | मुळ प्रांत |
|---|---|
| बुंदीचे लाडू/लड्डू | राजस्थान |
| चकली/चक्रीका | श्रीलंका, सिंगापूर |
| करंजी/ गुजीया | मध्यप्रदेश, गुजरात |
| अनारसे | बिहार |

**दिवाळी फराळ आणि आरोग्य:-**

शारीरिक आरोग्य हा विषय सध्या चर्चेचा आणि तेव्हढाच महत्त्वाचा होत आहे. अमूक खाल्लं तर काय होईल तमूक खाल्लं तर काय होईल ह्याचा खूपच जास्त विचार केला जात आहे. त्यात जास्त गोड, तळलेले आणि चमचमीत खाल्लं तर वजनवाढ आणि अपचनाच्या समस्या निर्माण होतात, पण दिवाळी फराळाच्या बाबतीत ह्या सगळ्या गोष्टींचा विचार करण्याची गरजच नाही कारण आपल्या सगळ्यांच सण आणि खाद्यसंस्कृती मध्ये आरोग्य शास्त्राचा अगोदर पासूनच विचार केला गेला आहे. दिवाळी सण आश्विन महिन्यात म्हणजेच जवळजवळ हिवाळा सुरू होण्याच्या अगोदर येतो. हिवाळ्यात आपल्या शरीरात गरजेची असलेली ऊर्जा आणि बळ निर्माण होण्यासाठी गोड तळलेले आणि चमचमीत पदार्थ योग्य प्रमाणात खाणे गरजेचं असतं. यामुळेच कसलाही विचार न करता दिवाळी आणि दिवाळी फराळाचा आनंद घ्या. आपल्या जवळच्या नातेवाईक आणि मित्रमंडळी सोबत ह्या सणाच्या नवीन आठवणी जपून ठेवा , परत कोणी विचारल की कशी झाली दिवाळी तर आपल्याकडच्या राजकारणी लोकांसारख म्हणता आलं पाहिजे.

काय ती दिवाळी
काय तो दिवाळीचा फराळ
एकदम **ok** मधी झालं आमचं



सूरज पगडे,
मो. क्र. ७९७२१६७६३५

# बदलता माणुस...



घरात टि.व्ही चं खोकं नव्हतं...
मोबाईल मध्ये डोकं नव्हतं...
काचा कवड्याचा खेळ होता...
नणंद भावजईचा मेळ होता...
गुटक्यानं भिती रंगत नव्हत्या...
ब्युटी पार्लरमध्ये झिंगत नव्हत्या...
ओठांवर ओरीजनल लाली होती...
चंद्राची खळी गाली होती...
पोरी मोबाईलवर गात नव्हत्या...
शाळेतुन पळून जात नव्हत्या...
वाकडा भांग पाडत नव्हत्या...
तोंड बांधून हिंडत नव्हत्या...
वाघासारखा लेक होता...
तवा बाप माणसात होता...
राजकारणात निष्ठा होती...
खरं बोलणाऱ्याची चेष्ठा नव्हती...
पैशावर पुढारी फुटत नव्हतं...

तत्वाशिवाय गटत नव्हतं...
प्रेम-माया अटत नव्हती...
चांगली माणसं तुटत नव्हती...
चहा-चिवड्याला रडत नव्हती...
चोरुन पिल्याबिगर चढत नव्हती...
आडाणी नेता भानात होता...
तळातला कार्यकर्ता मनात होता...
सोसायटीचा चेअरमन रानात होता..
तवा माणुस माणसात होता...
गावा शेजारी बार नव्हता...
रस्त्यावर दारुड्याचा कार नव्हता...
पाठीवर दफ्तराचा भार नव्हता...
अनवाणी पायाला रस्ता  गार होता...
हातावर छडीचा मार होता...
शाळेचा मास्तर दिलदार होता...
तवा पैशाला किंमत नव्हती...
आयुष्य म्हणजे गंमत नव्हती...
घासाघासात कस होता...
माणसाच्या वागण्यात रस होता...
तवा माणुस माणसात होता.....



राम नरहारे,
मो. क्र. ९०४९९७६०५६

# राम गोमारे, यू आर एन आयर्नमॅन..!
# फिनिश लाईनला हे शब्द कानावर येतात डोळे पाणावले..

१४ ऑगस्ट २०२२ रेसचा दिवस, कझाकस्तान मधील नूर सुलतान शहरातील इशिम नदीच्या च्या थंडगार पाण्यात ३.८ किलोमीटर पोहण्यासाठी पाण्यात उडी मारली खरी पण २०० मीटर अंतर कापतो न कापतो तेंव्हा श्वास घेताना त्रास होऊ लागला, श्वास कमी पडू लागला, स्पर्धेचं मनावर ओझ वाटू लागलं, हात वर करून पाण्यातून बाहेर पडावं वाटत होतं, पण तरीही स्वतःच स्वतःला समजाऊन सांगून स्वतःला नॉर्मल करण्याचा प्रयत्न करीत होतो, पोहण्याची माझी गती कमी होऊ लागली त्यामुळे बाजूने जाणाऱ्यांच्या लाथा व हात लागायला सुरुवात झाली तरीही स्वतःला नॉर्मल करून स्विमिंग चालू केलं, ३.८ कि मी स्विमिंग चे टप्पे केले आणि ते १तास ३६ मी मध्ये पूर्ण केले.




आता मात्र मनात आत्मविश्वास तयार झाला, tranjection time घेऊन लागलीच सायकलिंग चालू केली, वाहनांना मार्गावरील सर्व रस्ते बंद केले होते, त्यामुळे रस्त्यावर फक्त सायकलिस्टच दिसत होते, अफलातून रस्ते, संपूर्ण



स्पर्धेदरम्यान रस्त्यावर एकही खड्डा व गतिरोधक आला नाही, माझी धन्नो सुसाट पाळायला लागली, जवळपास १५ किमी अंतर झाल्यास शहराबाहेर सपाट पठार लागले, रस्त्याचे कडेला एकही मोठे झाड नाही, त्यामुळे वारा डायरेक्ट येऊन सायकल वर आदळू लागला, कधी हेड विंड, कधी टेल विंड, कधी क्रॉस विंड त्यामुळे एकसारखी गती ठेवता येत नव्हती, elite category चे सायकलिस्ट त्यांच्या गतीने सुसाट जात होते, त्यांना पाहून मी पण माझा गिअर मोड चेंज केला आणि स्पीड घ्यायला चालू केली, काही सायकलिस्ट रस्त्याच्या कडेला पंक्चर काढताना दिसले, आपली सायकल पंक्चर होऊ नये म्हणून देवाला साकडे घातले,

कारण पंक्चर झाली की ते स्वतःलाच काढणं भाग होतं, यासाठी कोणाचाही सपोर्ट घेता येत नाही, त्यात जवळपास २० मी जातात.



१८० किमी अंतराचे मी छोटे छोटे टार्गेट सेट केले, ३ तासात १०० किमी पूर्ण करणे हे माझे पहिले टारगेट आणि ते मी २ तास ५८ मी मध्ये पूर्ण केले. त्याप्रमाणे पुढचे ५० आणि ३० किमी चे टार्गेट सेट करून १८० किमी अंतर सायकल वरून एकदाही खाली न उतरता ५ तास ४२ मी मध्ये पूर्ण केले, सायकल स्टँडला लावली आणि पहिलं तिला मिठी मारून तिचे आभार व्यक्त केले, कारण इतक्या वाऱ्याच्या रोडला ठरल्या टार्गेट प्रमाणे कुठेही दगाफटका न होता वेळेत अंतर पूर्ण केले होते.

आता मात्र रेस पूर्ण हातात आली होती कारण रनिंग बाबतीत इतकी जास्त काही अडचण नव्हती भीती नव्हती, Astana Triathlon park मध्ये दुपारी दोन वाजण्याच्या सुमारास ऊनात माझी रनिंग चालू झाली, यात पण मी टारगेट सेट केले होते ४२ किमी अंतर मी २१, ११, ५, ५ असे टप्पे केले, २१ किमी चा पहिला टप्पा मला २ तासात पूर्ण करायचा होता, त्या हिशोबाने रनिंग चालू होती पेस ५/३० चा भेटत होता, हर्ट रेट १४० ठेऊन ठरल्या प्रमाणे २ तासात २१ किमी अंतर पूर्ण केले, उन वाढले होते त्यामुळे बॉडी टेंपरेचर वाढत होते, न्यूट्रिशन पॉईंटला थंडगार पाण्याचा स्पंच डोक्याला मानेला छातीला लाऊन पुढील रनिंग चालू केली, पुढच्या १ तासात मला ११ किमी अंतर पूर्ण करायचे होते परंतु १० किमी च पूर्ण झाले, परंतु हर्ट रेट १४० च्या खाली होता त्यामुळे एखादा किमी अंतर कमी झाले तरी चिंता नव्हती, अतिशय सुंदर अशा पार्क मध्ये १० किमी चे ४ लूप रनिंग करायची होती, प्रत्येक १००-२००मी अंतरावर शाळा, कॉलेज चे मुलं मुली रनर चा आत्मविश्वास वाढवून त्यांना प्रोत्साहित करीत होती, कुठ म्युझिक स्टॉल होते तर कुठ स्थानिक लोक टाळ्या वाजवत प्रतिसाद देत होते तसेच बऱ्याच ठिकाणी आपले इंडियन हातात तिरंगा घेऊन कमॉन इंडिया अशा शब्दात घोषणा देऊन प्रोत्साहित करीत होते, त्यामुळे अचानक अंगावर शहारे येऊन आपोआप पेस वाढत होता आणि शेवटी तिरंगा हातात घेऊन ४२ किमी अंतर ४ तास १५ मी मध्ये पूर्ण केले. राम गोमारे यु आर एन आयर्न मॅन हे शब्द कानावर पडल्यानंतर आपोआप डोळे पाणावले,



गेली वर्षभरामध्ये ठेवलेल्या संयमाला वाट मोकळी केली....दिवसभरातील हा सर्व प्रवास ११ तास ५० मी मध्ये पूर्ण केला... जो की हा टायमिंग बऱ्याच ट्रायथलीट चा ड्रीम टायमिंग असतो. त्या एका क्षणासाठी गेली वर्षभर जे काही कष्ट घेतले ते तर सार्थकी लागले होतेच, पण Ironman Race च्या त्या दिवसभरात माझी माझ्याशीच असलेली ही एक लढाई मी जिंकल्याची भावना झाली होती. रेस दिवशी बॉडी थकली तरी चालेल पण मन थकले नाही तर रेस आपण पूर्ण करू शकतो.




ट्रायथलॉन प्रवासाची खरी सुरुवात मा. कृष्ण प्रकाश (IPS) सर यांच्या प्रेरणेतून झाली, आदरणीय सरांनी मला वेळोवेळी केलेले मार्गदर्शन आणि दाखवलेली योग्य दिशा यामुळेच माझे आयर्न मॅन होण्याचे स्वप्न सत्यात उतरले आहे.

**Ironman स्पर्धा म्हणजे नक्की काय असते ?**

३.८ Km swimming (वेळ मर्यादा २ तास २० मिन ) नंतर १८० km cycling (वेळ मर्यादा ८ तास १० मिन) आणि मग ४२.२ km Mo running ( ६ तास ३० मिन ) असे एका पाठोपाठ तीन प्रकार (Triathlon) एकूण १७ तासांच्या cut off time च्या आत पूर्ण करायचे असते.



आयर्नमॅन राम गोमारे,

(सहायक पोलिस निरीक्षक हिंजवडी पोलीस स्टेशन पिंपरी चिंचवड.)

मो. क्र. ९९२२७५६८२८

# येलम समाजाच्या व्यावसायिक व राजकीय घोडदौडीत येणाऱ्या अडचणींचा लेखाजोखा...

सर्वप्रथम आपण व्यावसायिक अडचणींचा विचार करूयात. ज्याप्रमाणे मारवाडी, सिंधी, गुजराती लोक हे पारंपारिक व्यवसायिक असतात, त्याप्रमाणे येलम समाजात पारंपारिक व्यवसायिकता नसणे ही आपली सर्वात मोठी अडचण आहे. आपला समाज हा पूर्वीपासून शेतीवर निर्भर असणारा आहे. त्यामुळे आपल्या माणसांमध्ये व्यावसायिक गुणांची फारच कमतरता आहे. दुसरी गोष्ट समजा एखाद्याला व्यवसाय करायचाच आहे तर तो कोणता करावा इथूनच अडचणीला सुरुवात होते. आणि एखादा व्यवसाय सुरूच केला तर तो कायमचा टिकेलच याची शाश्वती नाही. कारण आपण पैसे आहेत म्हणून व्यवसायाला सुरुवात करतो परंतु तो व्यवसाय सुरू करण्याच्या अगोदर त्या संदर्भात कुठलंही व्यवसायीक मार्गदर्शन किंवा अनुभव, नॉलेज घेत नाही. परंपरागत व्यवसाय करणाऱ्यांमध्ये आणि आपल्यामध्ये हाच फरक आहे.



रिलायन्स उद्योग समूहाचे प्रमुख मुकेश अंबानी यांची मुलगी ईशा अंबानी रिलायन्स कंपनीची डायरेक्टर होण्याच्या अगोदर, शिक्षण पूर्ण झाल्यावर विदेशामध्ये इतर कंपन्यांमध्ये जॉब करत होती व व्यवसायाचा अनुभव घेत होती. परंतु आपल्या समाजातील तरुणांमध्ये ती मानसिकता नाही. आपल्याला डायरेक्ट गल्ल्यावर बसावं वाटतं. आपण व्यवसाय टाकण्यापूर्वी अनुभव घेण्याच्या भानगडीतच पडत नाहीत.

दुसरी महत्वाची अडचण आपलाच समाज आपल्या नव व्यावसायीकांना मदत करत नाही. उलट एखादा उद्योगात यशस्वी होत असेल तर, आपण त्यांची निंदा नालस्ती करतो. समजा त्याला काही अडचण आली तर आपण मदतीला जात नाहीत. इतर समाजात एकमेकांची मदत करत असतात. व्यावसायीक स्पर्धेत टिकून राहण्याकरीता ज्या गुणांची आवश्यकता असते ते गुणच आपल्या समाजात कमी प्रमाणात आहेत. कारण आपण आपली मुले लहान असताना त्यांना फक्त शेती किंवा नोकरी याविषयीच सांगत असतो. उदयोग-व्यापाराविषयी काहीही बोलत नाहीत.

एखादया समाज बांधवाने मंगल कार्यालय सुरु केले का लगेच इतर समाज बांधवही त्याच व्यवसायात उडी घेतात.

एखाद्याने हॉटेल चालू केले की लगेच दुसरा हॉटेल चालवतो. मुळात आपल्या मध्ये मोठ्या धैय्याचीच कमतरता आहे. म्हणून तर आपल्या समाजात उद्योजकांची कमतरता आहे. मी तर म्हणतो उद्योजकच नाहीत. आपला समाज हा फार मोठेपणात जातो. आपण बियर-बार, हॉटेल अशांना उदयोग समजतो. जे की मुळात उद्योगच नाहीत. उद्योग हे ऑइल इंडस्ट्री, शुगर फॅक्टरी, कॉटन इंडस्ट्री यांना उद्योग म्हणतात. इथे साधा मुरूम, दगड विकणारा सुद्धा स्वतःला फार मोठा उद्योजक समजायला लागला आहे. खर तर हीच खरी येलम समाजाची व्यावसायीक अडचण आहे. आपल्याला उद्योग-व्यवसाय हेच आणखी खऱ्या अर्थाने समजलेले नाही. मुळात आपणही उद्योजक होवू शकतो हा आत्मविश्वासच आपल्यात नाही.



राजकीय अडचणी -

मूळामध्ये आपल्या समाजातील खूप कमी व्यक्ती या राजकारणाच्या मुख्य प्रवाहामध्ये आहेत, हीच सर्वात मोठी अडचण आहे. येलम समाजातील राजकारणी लोकांची मोठी धैय्य नसणे, ही पण खुप मोठी अडचण आहे. इथं साधे नगरसेवक जरी झालं तरी खुप मोठं यश मिळवले आहे असं वाटतंय. खूप लोकांना आमदारकीचे डोहाळे लागलेले असतात, परंतु हिंम्मत कोणातच नाही. खरी अडचण आपण संघटित नसणे ही आहे. जोपर्यंत आपण संघटीत होत नाही तोपर्यंत मुख्य प्रवाहातील राजकीय पक्ष आपल्याला उमेदवारीच देणार नाहीत. आणि अपक्ष थांबण्याची कोणाची हिम्मत नाही. आणि हिम्मत केलीच तर आपलाच समाज साथ देत नाही. कारण आपल्या समाजात राजकीय खेकड्यांच प्रमाण मर्यादेपेक्षा खुप जास्त आहे.

दुसरी गोष्ट आपल्या समाजाची किंवा समाजातील नेते म्हणवून घेणाऱ्यांची मानसिकता गुलामगिरीची आहे. आपले नेते म्हणवून घेणारेच मुळात इतर समाजातील पुढाऱ्यांचे गुलाम म्हणून वावरतात. कुणाचे तरी डावे-उजवे हात म्हणून वावरत असतात. त्यांच्या पुढे-मागे करण्यातच धन्यता मानत असतात. त्यामुळे अशा येलम समाजातील काही नेत्यामुळे समाजाची प्रगती होत नाही. कुणाचा तरी समर्थक म्हणवून घेण्यातच यांना खुप मोठेपणा वाटत असतो.
येलम समाजाला जर राजकारणात मोठं व्हायचं असेल तर स्वतःमधील स्वाभिमान जागृत ठेवत संपूर्ण समाज एकत्रीत ठेवत विशेषत: नवयुवकांना संघटीत करून जिथं आपला समाज बांधव राजकारणात निवडणूकीला उभा आहे, तिथे पक्षीय मतभेद बाजूला ठेवून त्याची मदत केली पाहीजे. तर आणि तरच आपण राजकीय यश मिळवू शकतो. मग ति निवडणूक पंचायत समीतीची असेल, जिल्हा परिषदेची असेल किंवा विधानसभेची असो.

समाजातील एक व्यक्ती जरी राजकारणात मोठी झाली तर निश्चितपणे त्याचा समाजालाच मोठ फायदा होतो. सन्माननीय गोपीनाथरावजी मुंडे साहेब त्यांच्या वंजारी समाजाच्या एकत्रीत पाठिंब्याने खुप मोठे झाले. आणि ते उच्च पदावर गेल्यावर त्यांच्या समाजातील हजारो युवकांना त्याचा सरकारी नौकरी मध्ये फायदा झाला. उद्योग व व्यवसायामध्ये फायदा झाला आणि राजकाराणामध्ये सुद्धा खूप फायदा झाला. त्यामुळे येलम समाजाने एकत्रित येत राजकारणात मोठं यश मिळवलं पाहीजे. एकत्र येणे म्हणजे नुसतं वधु-वर संमेलना पुरतं नाही हे लक्षात घेणे फार गरजेच आहे. त्यामुळे समाजाची एकत्रित ताकद दाखवण्यासाठी व नव उद्योजक आणि स्वाभिमानी राजकारणी घडविण्यासाठी सर्वांनी एकत्र येणे ही काळाची गरज आहे.



संतोष व्यंकटराव पनाळे, लातूर,
मो. क्र. ८४२१३८०८८८

# माझा रशियाचा प्रवास

१६ जुलै २०२२ ला सकाळी नेहमीप्रमाणे ई-मेल ओपन केला. झीरो प्लस आंतरराष्टीय चित्रपट महोत्सव ट्र्युमेन रशिया कडुन इमेल आला कि, तुमचा प्रश्न हा लघुपट आंतरराष्ट्रीय अंतिम २० लघुपटांसोबत स्पर्धेत निवडला गेला आहे. महोत्सवाच्या नवव्या आवृतीत, १२५ देशांमधून एकूण १८०० लघुपटांमधून या महोत्सवात १७ देशांतील २० लघुपटांचा समावेश होता. ९ आक्टोबर २०२२ ट्र्युमेन मध्ये आयोजित होणाऱ्या निरोप समारंभात ८ श्रेणीतील विजेत्यांची घोषणा करण्यात येणार होती. खुप आनंद झाला पण रशियाची युद्धजन्य परिस्थिती पाहुन थोडं नाराज पण झालो कारण मला रशियात जाता येणार नाही, हे त्या नाराजी मागील कारण होते. मागच्या वर्षी युनिसेफ इंनोसेन्टी चित्रपट महोत्सव फ्लोरेन्स इटली या युनिसेफ आयोजित चित्रपट महोत्सवात 'प्रश्न' साठी मला आयरिश पुरस्कार लेखनासाठी मिळाला होता. आयरिश पुरस्कार मिळवणारा मी भारतातील पहिला, तिथं जाऊन हा पुरस्कार स्वीकारावा असं वाटल होतं पण मला कोविड परिस्थितीमुळे जाता आलं नव्हतं.



'प्रश्न ' हा माझा २००९ च्या बहुचर्चित लघुपट 'वर्तुळ' नंतरचा तिसरा लघुपट आहे. मराठवाड्यातील ऊसतोड कामगारांच्या मुलांच्या शिक्षणाच्या समस्येवर आधारलेला 'प्रश्न' हा लघुपट आहे. वर्षातील अनेक महिने होणाऱ्या स्थलांतरामुळे मराठवाड्यातील ऊसतोड कामगारांची मुले शिक्षणापासून मोठा काळ वंचित राहतात. एकूणच ग्रामीण भागातील शाळांची परिस्थिती, शिक्षकांवरील ताण, वेगवेगळ्या लोकांचा शिक्षणाकडे पाहण्याचा दृष्टिकोन या लघुपटात दिसतो. 'प्रश्न ' हा लघुपट आत्तापर्यन्त देशभरातील राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय ४० महोत्सवात निवडला गेलेला आहे आणि १७ पुरस्काराने सन्मानित आहे.




आपला लघुपट रशिया मध्ये निवडला गेला आहे हे सांगायच धाडस पण होत नव्हतं. महोत्सवाने आमंत्रण पाठवलं होतं पण तिकडे जावं कि नाही या विचारात होतो. एक तर कोविड मध्ये कलाकार असल्यामुळे आर्थिक परिस्थिती पार बिघडलेली. तरी पण एक दिवस थोडासा धीर करुन व्हिसासाठी अर्ज केला. माझा एक मित्र म्हंटला एक तर घरात बस किंवा लघुपट निवड झालाय

म्हणुन प्रयत्न कर कारण तुझ्यासारख्याने अशी संधी गमाऊ नये. मग झाली हालचाल सुरु आणि प्रचंड प्रयत्नांनी मी पुणे ते ट्र्युमेन आणि ट्र्युमेन ते उदगीर या सर्व मार्गाची ट्रॅव्हल बुकिंग करून टाकली.रुपये रुबल्स मध्ये बदलून घेतले आणि मी  रशिया वारीला निघालो अर्थात या सर्व प्रक्रियेत मित्रांचा प्रचंड मोलाचा वाटा आहे. २९ सप्टेंबर सकाळी ६ वाजता मी  मुंबई  - बहारीन - मॉस्को असा प्रवास केला आणि मॉस्को मध्ये ३;३० मि. पोचलो.  बहारीन ते मॉस्को च्या फ्लाईट मध्ये मी एकटा कृष्णवर्णीय होतो. यूएई च्या पुढे गेल्यानंतर तुम्ही ना येलम असता  ना ब्राह्मण ना मराठी ना बंगाली तर तुम्ही असता फक्त भारतीय, पाकिस्तानी, बांगलादेशी किंवा श्रीलंकन.

मास्कोमधील मधील परिस्थिती काय असेल या विचाराने  मनात धाकधुक होतीच पण मस्त संध्याकाळचं वातावरण, थंडीची झुळूक आणि बिनधास्त वावरत असलेला रशियन माणुस बघुन सुखावलो. रशिया फार स्वच्छ, तुरळक माणसं असलेला आणि मोठ्यामोठे रस्ते आणि इमारती ने व्यापलेला आहे. भारताच्या ५ पट असलेल्या आख्या रशियाची लोकसंख्या मात्र आपल्या महाराष्ट्राएवढी आहे. रशियन माणसांचं इंग्रजी फार वाईट आहे. ते फार मोडक्या  इंग्लिशमध्ये आपल्याशी संवाद साधताना आपला कॉन्फिडन्स मात्र आकाशाला भिडतो. पुढचे २ दिवस मी मॉस्को मध्ये राहणार होतो. कोणीही परदेश वारीला गेल्यावर आपल्याकडे खुप प्रश्न असतात, त्या प्रश्नांची उत्तरं आणि आपल्या बरोबरच उदगीर, लातुर आणि पुणे येथील आपल्या मित्रांना रशिया पहिल्याचा आनंद  मिळावा या साठी पहिल्यांदाच मी विडिओ बनवायला लागलो आणि हॉटेलवर परतल्यावर सगळ्यांना व्हाट्स ॲप ने पाठवायला लागलो. रशियामध्ये फेसबुक आणि इन्स्टाग्राम बॅन आहेत. मी मॉस्को मध्ये अत्यंत मनोभावे भेट दिलेलं स्थान म्हणजे साहित्यसम्राट लोकशाहीर अण्णाभाऊ साठे स्मारक. मोठ्या लोकांना  त्यांच्या कामाला जातीमध्ये अडकवुन ठेवु नये असं कुठं तरी वाचलं होतं. त्यांच्या बाजुलाच राष्ट्रपिता महात्मा गांधी स्मारक सुद्धा आहे. या दोन महान व्यक्तिमत्त्वांच्या स्मारकांना भेट देऊन मी ट्र्युमेन च्या दिशेने निघालो.





सायबेरियातील ट्र्युमेन मॉस्को पासून उत्तरेला जवळपास २००० की.मी अंतरावर असलेलं हे अत्यंत देखणं असं  शहर आहे. एअरपोर्ट वरून बाहेर पडताच संतोष राम असा एक आवाज आला, एक  युवती आणि एक व्यक्ती मला रिसिव्ह करायला आले

होते. लगेच आम्ही हॉटेलच्या दिशेने निघालो हॉटेल मर्क्युर हे माझ ८ दवसांच राहण्याच ठिकाण होतं. सकाळपासून संध्याकाळपर्यंत माझ्यासोबत दुभाषी युवती असायची. प्रचंड उत्साहात आणि नियोजनबद्ध असा झिरो प्लस आंतरराष्ट्रीय महोत्सव ट्र्युमेन मध्ये होत होता. पहिल्याच दिवशी सर्व आंतरराष्ट्रीय दिग्दर्शक व ज्युरी ची ओळख झाली. मी भारताचा प्रतिनिधी म्हणुन तिथे आमंत्रित असल्यामुळे कुठलीही चुक होऊ न देता महोत्सवाचा आनंद घेत होतो.




ट्र्युमेन शहरात आणि महोत्सवात तर नक्कीच एकमेव भारतीय आणि आशियाई होतो. मी हॉटेल बाहेर पडल्यावर रस्त्यावरील रशियन लोक माझ्याकडे फार कुतूहलाने पाहत असत. ६ ऑक्टोबरला दुपारी २ वाजून ३० मिनिटाला माझा लघुपट तिथे दाखवला गेला. प्रचंड उत्साहात तिथल्या युवकांनी माझा ‘प्रश्न’ हा लघुपट पाहिला. आपण बनवलेली कलाकृती या देशातील लोक समजून घेतील कि त्यांना समजणार नाही या उत्सुकतेने मी त्यांच्या प्रतिसादाची वाट पाहत होतो. लघुपट प्रदर्शनानंतर प्रेक्षकांनी त्यांच्या प्रतिक्रिया दिल्या. खुप मुलांनी महिलांनी माझ्या सोबत फोटो काढले ऑटोग्राफ घेतले. ते माझ्यासाठी फार नवल होतं. एवढा प्रयत्न करून ट्र्युमेनला गेलेला मी आता मात्र कॉन्फिडन्ट आणि समाधानी झालो. पुढे आठव्या दिवशी महोत्सवाच्या निरोप समारंभात ‘ प्रश्न’ ला फॉर द डेव्हलोपमेंट ऑफ एज्युकेशन इन रूरल एरिया पुरस्कार प्राप्त झाला.. त्या क्षणाला मला खुप आनंद झाला.

ट्र्युमेन लव्हर्स ब्रिज, गरमपाण्याचे फवारे आणि ट्र्युब्लेस्क येथे आम्ही सर्व फिल्ममेकर्स ज्युरी यांच्या सहली गेल्या. ती ठिकाणे माझ्यासाठी फार नवखी होती. भारत आणि रशिया हे दोन टोक आहेत प्रचंड बदल आहेत पण माणसं सारखीच प्रेमळ. तोपर्यंत वेगवेगळ्या व्हाट्स अँप ग्रुप्सवर येलम समाजाचा रशियावारी केलेला पहिला दिग्दर्शक (फिल्ममेकर) , साहित्य सम्राट लोकशाहीर अण्णाभाऊ साठे स्मारकाला भेट देणारा पहिला भारतीय कलावंत अशी माझ्याबद्दल पब्लिसिटी चालु झाली. तिथुन माझा भारताकडे परतीचा प्रवास सुरु झाला. रशियाने खूप काही दिलं होतं, खूप आठवणी, ज्ञानात खूप भर. नक्कीच या रशियन टूर मुळे मला स्वतःला दुसऱ्याच्या नजरेने माझ्याकडे पाहता आलं.



लेखक संतोष राम
हे ‘ प्रश्न ’ या लघुपटाचे दिग्दर्शक आहेत,
मो. क्र. ९८२२८२७२७७

# रेड्डी स्पोर्ट्स फाउंडेशनमुळे विद्यार्थी घेत आहेत गरुडभरारी

रेड्डी स्पोर्ट्स फाउंडेशन औरंगाबाद ची स्थापना २००८-०९ मध्ये झाली. विद्यार्थ्यांना उच्च दर्जाची शिकवण देऊन, प्रशिक्षित करून त्यांना त्यांचे धैय्य प्राप्त करून देण्यासाठी फाउंडेशन कार्यरत आहे. या फाउंडेशन च्या स्थापनेपासून आजपर्यंत फाउंडेशन मधील जवळपास ११०० विद्यार्थी PSI पदावर निवडले गेले आहेत. तसेच ६०० च्या आसपास विद्यार्थ्यांची पोलीस या पदावर निवड झालेली आहे. तसेच ॲथलेटिक्स मध्ये के.के पाटील, आर.सी गायकवाड, शिंदे सर, बी.के पाटील हे तीस वर्षाच्या वरील गटामध्ये इंटरनॅशनलला मेडल घेऊन आले आहेत. ते बजाज कंपनी माफर्फत खेळतात. तसेच येथील आतापर्यंत ४० ते ५० मुले स्टेट व नॅशनल लेवलला सुद्धा सहभागी झाले आहेत.






रफिक शेख हा पोलीस कॉन्स्टेबल औरंगाबाद (ग्रामीण) मराठवाड्यातील पहिला (पोलीस कॉन्स्टेबल) एव्हरेस्टवीर होण्याचा मान मिळवला आहे. मयूर बोरसे यांनी तर स्पेन मध्ये झालेल्या टेनीस स्पर्धेमध्ये सहभाग घेतला आहे. तसेच लॉन टेनिस मध्ये आत्तापर्यंत १५ ते २० मुलांनी नॅशनल पदक व ३० ते ४० मुलांनी सहभाग नोंदवला आहे. तलवारबाजी मध्ये तुषार अहिरे इंटरनॅशनल प्लेअर असे छत्रपती आव्हाड विद्यार्थी तलवारबाजी मध्ये आतापर्यंत ४० ते ५० मुले नॅशनल मध्ये प्रावीण्य पदक तसेच सहभाग घेतला आहे. स्कॉर्स मध्ये १० ते १२ नॅशनल तसेच ३० ते ३५ मुलांनी सहभाग घेतला आहे. क्रिकेट मध्ये प्रवीण केला, हे सध्या मुंबई संघाकडून खेळत आहेत. तसेच धनराज परदेशी, कार्तिक बाल्या हे सध्या नॅशनल लेव्हलच्या स्पर्धेमध्ये भाग घेत आहेत.

प्रशिक्षक
श्री.भरत रेड्डी सर
मो. 8275515176




# रेड्डी स्पोर्टस फाऊंडेशन

Age Group Kids 5 Yrs.Onwards | All Game Fitness

Athlete Training



Basic Training



Kids Fitness



Fitness Training



fencing game
Archery Game
Lawn Tennis
Badminton Game
Squash Game

ठिकाण : विभागीय क्रिडा संकुल,गारखेडा परिसर,औरंगाबाद.

विशेष म्हणजे, रेड्डी स्पोर्ट्र्स फाउंडेशनच्या मार्फत दरवर्षी १५ ते २० मुलांना मोफत प्रशिक्षण देऊन त्यांच्या अडचणी दूर करण्याचा प्रयत्न केला जातो. विद्यार्थ्यांना पोलीस भरती अथवा पीएसआय या पदावर निवड करण्यासाठी आम्ही सर्व मदत असतो आणि दरवर्षी खेळाला पुढे घेऊन जाण्यासाठी सामाजिक जाणिवेतून अगदी निस्वार्थभावनेने ५ अनाथ मुलांना मदत करण्याचे कार्य सुद्धा आमच्या फाउंडेशन कडून सुरु आहे.



भरत रेड्डी
(संस्थापक - रेड्डी स्पोर्ट्र्स फाउंडेशन औरंगाबाद)
मो. क्र. ८२७५५१५१७६

# विधायक कार्याच्या...आठवणींचे स्मरण करताना...

पुणे शहर व परिसरात वास्तव्यास असणाऱ्यांची ओळख व्हावी, एकमेकांच्या अडचणीत मदत व्हावी हा उद्देश ठेवून १९८८ मध्ये श्री वांगवाड यांचेकडून समाज बांधवाना एकत्रित करून राष्ट्रीय रेड्डी येलम संस्थेच्या स्थापनेची मुहूर्तमेढ रोवण्यात आली. त्यानंतर पुढील दोन वर्षे प्रयत्नाची पराकाष्ठा करून दिनांक १९ नोव्हेंबर १९९० रोजी धर्मादाय अयुक्त पुणे यांच्याकडे संस्थेची रीतसर नोंदणी करण्यात आली. मधल्या काळात शहर व परिसरात वास्तव्यास असणाऱ्या समाज बांधवांच्या गाठी भेटी घेणे, अजिव सभासद व्हा, म्हणून त्यांना विनंती करणे व ५०० रु ची देणगी घेऊन संस्थेच्या रोख रकमेत वाढ करणे व जे सभासद झाले नाहीत त्यांचा पाठपुरावा करण्यासाठी सर्व सभासदांनी केलेली जीवापाड मेहनत आठवली की आजही समाधान वाटतं.

तसं पाहिलं तर ही संस्था स्थापन करण्यामागे एकच उद्देश होता, तो म्हणजे अडचणीच्या काळात आपल्या समाज बांधवांच्या मदतीला आपल्याला धावून जाता यावे, शहरात नवीन येणाऱ्यांना जमेल ती मदत व मार्गदर्शन करणे तसेच दसरा, दिवाळी, व मकरसंक्राती च्या वेळी सगळे एकत्र येवून विचारांचे आदानप्रदान करत एकत्र वेळ घालवता यावा. बरं पहिले विश्वस्थ मंडळ डॉ. मुस्कावाड यांच्या अध्यक्षतेखाली निवडण्यात आले. श्री. वांगवाड यांची सेक्रेटरी व माझी खजिनदार म्हणून निवड झाली. येथे जो एकोपा व काम चालू होते त्याची माहिती आपले मूळगावी लातूर येथे पोहोचली. कारण लातूर येथील आयोजित समाज मेळाव्यास पुणे येथून स्वखर्चाने आम्ही २० जण हजर होतो.



आपल्या समाजातील जेष्ठ श्री ज्ञानोबा (मामा) शेळके व वैकुंठवासी स्व. भारत महाराज गोपे यांच्या मार्गदर्शनाखाली संस्थेने आपल्या समाजासाठी काहीतरी भरीव कार्य हाती घ्यावे व त्याची सुरुवात आळंदी येथून करावी यावर सर्वांचे एकमत झाले व आळंदी येथून सुरुवात केली तर ज्ञानेश्वर माऊली कोणतीही अडचण येऊ देणार नाहीत ही सर्वांना खात्री होती.

आपला समाज धार्मिक असून आळंदी व पंढरपूर येथे तेली, कोळी, माळी, मातंग समाज, मराठा या सर्व अठरा पगड जातीच्या धर्मशाळा आहेत. नाही ती फक्त येलम समाजाची व आपण ती उणीव भरून काढावी व समाजाचे देणे फेडावे या भावनेने स्व. भारत महाराज गोपे यांनी ५/१० गुंठे जागेचा शोध घेण्यास सुरुवात केली व संतश्रेष्ठ माऊली

कृपेने देहूफाटा येथे ४८ गुंठे जागा उपलब्ध आहे हे कळले. या जागेचा व्यवहार करण्यासाठी महाराष्ट्र राज्य सहकारी संघात बैठक घेऊन सदर जागा खरेदी करून (रु ६,२५,०००/-) सदर रकेमेचा विचार करता ही बाब पुणे येथील लोकांच्या आवाक्याबाहेरची आहे आणि या कामी आपल्याच समाजातील श्रीमंत व दानशूर लोकांना विनंती करावी असे ठरले. याकामी श्री ज्ञानोबा पिनाटे (माऊली) व श्री ज्ञानोबा शेळके (मामा) यांनी सक्रीय भाग घेऊन कार्य सिद्धीस नेण्याचा संकल्प केला व तो पूर्ण केला.

जागा खरेदीसाठी लागणाऱ्या रकमेपैकी रु २,००,०००/- रुपये हे पुणेकर सभासदांकडून जमा करावेत व बाकीची रक्कम लातूर भागातून जमा केली तर व्यवहार लवकर पूर्ण होईल असे ठरवून इसार खरेदी खत करून घेतले. यात पुणेकरांनी आपली जबाबदारी पूर्ण करण्यासाठी जीवापाड मेहेनत घेतली. आर्थिक बळ उभे करण्यासाठी व्यवसाईक नाटकाचे प्रयोग खरेदी करून,नाटकाची तिकीटे विकून व नाटक स्वतः बघून रक्कम जमा करण्यात धन्यता मानली. तसेच देणगी, वर्गणी, स्मरणिका असे विविध मार्ग अवलंबून रक्कम जमा करण्यात येत होती पण  खरेदीखत करण्याच्या तारखेला रक्कम जमा होऊ शकली नाही व जागा मालक श्री शांतीलाल धोका यांनी व्यवहार रद्द करावा का याची विचारणा केली, पण जागा मालक श्री शांतीलाल धोका यांनी स्व. भारत महाराज गोपे यांचेवरील श्रध्येपोटी आणखी एक वर्षाचा काळ वाढवून दिला. नंतर श्री ज्ञानोबा पिनाटे (माऊली) व श्री ज्ञानोबा शेळके (मामा) , श्री विक्रम गोजमगुंडे, नामदेवराव पाटील यांनी या समाज कार्यास वाहून घेऊन रक्कम जमा केली व अखेरीस कमी पडणारी रक्कम स्वतः देऊन जागा खरेदीचा हा व्यवहार पूर्ण केला. ही अनामत जमा नंतर परत कळण्यात आली किंवा इतर कामी संस्थेच्या विकासासाठी वापरली गेली.

तसेच लातूर भागातील दानशूर व्यक्तीनी भरीव मदत केल्यामुळेच रक्कम जमा करण्यासाठी पुणेकर मंडळाने औरंगाबाद, उदगीर,अहमदपूर, गंगाखेड, पानगाव, लातूर या भागात अनेक वेळा भेट देऊन व लातूरकर मंडळींना सोबत घेऊन भरपूर परिश्रमाने कार्य पूर्ण केले. जागा खरेदीनंतर २००४ मध्ये आळंदी यात्रा संस्थेच्या जागेत करण्यात आली. प्रथम ज्ञानेश्वरी पारायण ह.भ.प लक्ष्मन शास्त्री मोटे यांनी करून सुरुवात केली, तर अन्नदानासाठी लातूर परिसरातून पूर्ण सहकार्य व पुणे शहर व परिसरातून पण या कामी योग्य सहभाग घेण्यात आला. पहिल्या वर्षी ३०० भाविकांच्या जेवणाची सोय केली होती पण आपल्या कडे फक्त ५० वारकरी होते. केलेले अन्न वाया जाऊ नये म्हणून संस्थेच्या वतीने इतर फडावर वारकरी पाठवा अशी विनवणी करीत फिरावे लागले. ५ ते ६ फडावर गेल्यावर त्या फडकऱ्यांनी त्यांचे कडून प्रसाद घेण्यासाठी वारकरी पाठवले. प्रथम कार्तिकीचा जमा खर्च केल्यानंतर रु ६०००/- रुपये कमी पडत होते ती रक्कम पुणेकर मंडळींनी देणगी म्हणून दिली.

नंतरच्या दोन तीन वर्षात संस्थेमार्फत बांधकामबाबत चर्चा, निधी संकलन व याकामी औरंगाबाद, उदगीर, अहमदपूर, गंगाखेड, पानगाव, लातूर आदी भागातून देणगी जमा करण्यासाठी सर्व सभासद चिकाटीने प्रयत्न करीत होते व त्यास यश सुद्धा येत गेले. तसेच समाजातील धनसंपन्न व्यक्तींनी रु ६००००/- प्रत्येकी जमा करून संस्थेच्या परिसरात १०



खोल्यांचे बांधकाम पूर्ण करण्यात संस्था यशस्वी झाली. तसेच सभागृहाचे नियोजन व बांधकाम याचा अंदाजे खर्च रु. सहा लाख याचा ताळमेळ बसवत श्री ज्ञानोबा पिनाटे (माऊली) यांनी पुढाकार घेऊन कार्य पूर्णपणे पार पाडले. हे काम करता करता सभागृह बांधकामाचा खर्च रु. दहा लाख झाला व आर्थिक गणित कोलमडून पडले. शेवटी या कामी स्व. भारत महाराज गोपे यांनी स्वताचे रु एक लाख पन्नास हजार घालून सभागृहाचे काम पूर्ण केले.

सभागृहाच्या भिंतीचे काम बाकी असताना १९९८ मध्ये पावसाने थैमान घालून वारकरी मंडळींची गैरसोय केली व ही गैरसोय टाळावी या निर्धाराने संस्थेचे अध्यक्ष यांनी या कामाची पूर्ण जबाबदारी स्वतःवर घेऊन, भिंती खिडकी व काचा, लाईट फीटीग, पंखे व इतर तत्सम कामे पूर्ण केली. तसेच वारकरी व माताभगिनी यांना गरजेचे असणारे बाथरूम चे काम सन २००२ मध्ये पूर्ण करून स्वच्छ परिसर, सुंदर परिसर ही संकल्पना पूर्ण केली. मधल्या काळात सन १९९७ पासून संस्थेमार्फत आळंदी ते पंढरपूर (आषाढी) पायी दिंडी चालू करण्यात आली व या सुंदर कामास स्व भारत महाराज बरुरे यांनी पूर्ण वाहून घेतले होते. आजही आपली आळंदी ते पंढरपूर (आषाढी) पायी दिंडी चालू असून ती ह.भ.प नाथ महाराज बेंबडे यांच्या सहकार्याने पार पडत आहे. तसं १९८८ पासून पायी दिंडी चालू असून वारीला भरपूर प्रतिसाद मिळत आहे. लोकवर्गणी व अन्नदाते यांच्या सहकार्याने आळंदी ते पंढरपूर (आषाढी) नित्यनेमाने चालू आहे. पायी दिंडी मध्ये आता अंदाजे १२०० वारकरी सहभागी होतात व त्यांचा जेवणाचा सर्व खर्च आपल्याच समाजातील दानशूर व्यक्ती करत आहेत.

पंढरपूर येथे संस्थेने १९९९ मध्ये चंद्रभागे काठी (२.५० गुंठे) जागा खरेदी करून सदर जागेवर भव्य इमारत उभी केली आहे. व परत या जागे शेजारी आणखी एक जागा (२.५० गुंठे) खरेदी करून तेथेही इमारत उभी केली आहे. पंढरपूर येथील काम स्व. भारत महाराज बरुरे, ह.भ.प नाथ महाराज बेंबडे, श्री ज्ञानोबा पिनाटे (माऊली), व श्री ज्ञानोबा शेळके (मामा) यांच्या अथक कार्यामुळे शक्य झाले आहे. आज घडीला आळंदी येथे २५०० वारकरी एक आठवडा यात्रेला (कार्तिकी) असतात. त्यांना राहण्यासाठी राहुटी देण्यापासून ते परत माघारी जाईपर्यंत सर्व जबाबदारी पुणेकर मंडळी निस्वार्थपणे करीत आहेत या गोष्टीचा सार्थ अभिमान वाटतो. संस्थेच्या सुरुवातीच्या काळात व समाजासाठी काम करण्याची मला संधी मिळाली याचा सुद्धा मला सार्थ अभिमान आहे.

"ईवलेसे रोप लाविले दारी त्याचा वेलू गेला गगनावरी"



वसंत शिंगडे, कोथरूड-पुणे
मो. क्र. ९४२३५३१३२०

# व्यक्त झालं पाहिजे ..!

मानवी आयुष्याला अनेक पदर असतात आणि ते आयुष्य पुढे जाईल तसे तसे हळुहळू उलगडत असतात. आयुष्य जगतांना आपण सर्वांनी आदर्शवत आयुष्याची कल्पना केलेली असते पण बऱ्याचदा वास्तवात गोष्टी अगदी मनाच्या विपरीत घडताना दिसतात. खूप मेहनत करूनही येणारे अपयश, आर्थिक ताणतणाव, कौटुंबिक कलह, प्रेमभंग अशा कितीतरी गोष्टी मनाविरुद्ध घडत असतात. एकामागून एक संकटे येत असतात, खूप निराशा मनात येते, काहीवेळा तर अस वाटत की'संपलं सगळं'.

यश-अपयश, सुख दुख हे प्रत्येकाच्या जीवनाचा अविभाज्य भाग आहे ते आयुष्याच्या अंतापर्यंत प्रत्येकाच्या जीवनात असणारच आहे, पण मग निराशेच्या गर्तेत अडकून रहायचे का? वेळोवेळी येणाऱ्या निराशेतून बाहेर पडण्यासाठी सर्वात महत्वाचा उपाय काय? तर तो म्हणजे माझ्या मते 'व्यक्त होणं'!

**Express yourself**

सध्याच्या या धकाधकीच्या युगात आपण खरच व्यक्त होतो का? आणि सर्वात महत्वाचा प्रश्न असतो तो म्हणजे 'कोणाजवळ व्यक्त होऊ?' काय **guarantee** की तो कोणाला या गोष्टी नाही सांगणार? परिणामी आपण बऱ्याच गोष्टी मनात साचवतो साचवत राहतो आणि विचारांचा गुंता वाढत जातो, तो तसाच वाढत गेला तर अगदी सामान्य असणारी समस्या पुढे खूपगंभीर भासते परिणामी ताणतणाव,नैराश्य, मनोविकार,आत्महत्या या बाबीना सामोरे जावे लागते,त्यामुळे आपण प्रत्येकांनी व्यक्त होणे फार गरजेचे आहे. यासाठी सर्वात महत्वाचे आहे ते म्हणजे मैत्रीत, कुटुंबात,नात्यांमध्ये 'संवाद' असणे.

बऱ्याचवेळा वेळोवेळी व्यक्त न झाल्यामुळे गैरसमजातून नाती दुरावली जातात, यामुळे वेळोवेळी आपलं प्रेम, राग,

गैरसमज यांबद्दल एकमेकांपुढे व्यक्त होण खूप गरजेचं आहे. खरच हसणारा प्रत्येक माणूस आतून आनंदी असतो का??असे असते तर सतत हसमुख चेहरा असणारा लोकप्रिय अभिनेता सुशांतसिंग राजपूत आज आपल्यामधे असता. सांगण्याचा उद्देश हाच की एकमेकांमधला 'संवाद' तो 'संवाद साधणारी माणसं'दोन्ही हरवत चालली आहेत,म्हणून मनात गोष्टी साचून देता वेळोवेळी व्यक्त व्हा!

आयुष्य खऱ्या अर्थाने आनंदी जगायचे असेल तर नातेसंबंध फक्त । निर्माण करणं एवढं पुरेस नाही तर ते 'जपण' (**keep in touch**) सर्वात महत्वाच! सुखी आयुष्य जगण्यासाठी 'पुरेसा पैसा जिवाभावाची माणसं' या बाबी पुरेशा आहेत. 'अपेक्षापूर्तीच ओझ थोड हलक केल कि जगणं सोप होत. आयुष्य अतिसमृद्ध करण्याच्या नादात 'जगणं'तर हरवत नाही ना, हे पहायला हव. शेवटी सर्वात महत्वाच आहे, 'मिळालेल सुंदर आयुष्य भरभरून जगणं', हो ना!



निलेश आरडले

मो. क्र. ८६२४०९८५४४

# सामाजिक स्थित्यंतर आणि समुपदेशन ही काळाची गरज

येलम समाज - एक कष्टाळू, काटकसरी, सच्चा, आणि साधा समाज. माझी १९८१ साली या समाजाशी ओळख झाली. तशी मी पुर्वाश्रमीची ब्राह्मण समाजातील एक सुशिक्षित मुलगी. आज या दिवाळी अंकात लेख लिहिण्याचा योग आला आणि जुन्या आठवणींना उजाळा मिळाला. हुंडा पध्दत इतर समाजाप्रमाणे या ही समाजाचा अविभाज्य भाग आहे. त्याकाळी आम्ही कोर्ट मॅरेज केलं हा ही एक चर्चेचा विषय ठरला. आज जवळपास चाळीस वर्षांपेक्षा जास्त काळ उलटला. अनेक स्थित्यंतरे पाहिली, येलम समाज पुढारला. शेती व्यवसाय करण्याऱ्या या समाजानं इतर क्षेत्रात देखील आपला ठसा उमटवला. पण आज समाजात बदल ही खूप झाले आहेत आणि ते लिहीतांना ही थोडी खंतच वाटत आहे. आपण आज इथे अनेक गोष्टींचा उहापोह करणार आहोत.




लग्नसंस्था, येलम समाज आणि होणारे बदल - एकदा सासरी गेलेल्या मुलीला सुख दुःखाच्या प्रसंगी भेटायला जायचे आणि तिनं ही वर्षात एखाद्या प्रसंगी माहेरी यायचं ह्या प्रथेत हळूहळू बदल घडत गेले. स्वतंत्र विचार, आणि इतर बऱ्याच गोष्टीमुळं मुली नांदणार तर माझ्या पद्धतीने असं घडतं आहे. मी पाहिलंय काही ठिकाणी मुंबई पुण्यात मुलं संसार करत आहेत पण गावातल्या आईवडीलांना मुलांच्या घरात जागा नाही.

गावी वर्षाला एकदा ही मुलं आईबापांना भेटायला येणार सुनबाई तर फोनवरच दर्शन देतात हा बदल सकारात्मक नाही पुढे जाताना मागे वळून पाहिले पाहिजे आपली प्रगती कळते, कदाचित हे विचार नाही पटणार कुणाला पण हे सत्य आहे, हे नक्की. सुशिक्षित व प्रशिक्षित या मध्ये एक लाईन आहे. आपल्याकडे डिग्री आहे तर आपण सुशिक्षित आहोत का? मी म्हणेन मुळीच नाही, आपण प्रशिक्षित आहोत. सुशिक्षित म्हणजे सर्वांगीण विकास. जी व्यक्ती विचार करते ती सुशिक्षित. शिक्षणामुळे घटस्फोटाचे प्रमाण वाढले असं नाही तर मी कमवून एकटी राहू शकतआहे हा विचार मुलांना व मुलींना घटस्फोट घेण्याच्या विचारांशी नेऊन ठेवत आहे

सहनशीलता, समजून घेणे आवश्यक आहे, महत्वाचे आहे. जुन्या काळी सुध्दा मुलामुलींच्या मध्ये वादविवाद होत असत पण घरात मोठ्या लोकांचा वावर असे दोघांचेही म्हणणे ऐकून घेतले जात असे आणि घरातील मंडळी वाद मिटवत असत. हल्ली ही गोष्ट दूर्लभ झाली आहे. वाद पराकोटीचे होतात आणि विकोपाला गेले की वेगळे होणार अशी चिन्हे दिसू लागतात. समुपदेशकांची भुमिका हल्ली अत्यंत महत्त्वाची झाली आहे. पण यालाही काही मर्यादा आहेत. समुपदेशन केंद्र

ही काळाची गरज आहे हे नक्की पण फार उशीर झाला तर समुपदेशकांची भुमिका पण फारशी मदत करु शकत नाही. सारासार विचार, सद्सद्विवेकबुध्दी आणि माघार घ्यावी हे विचार दोघांनाही करणं आवश्यक आहे.

आपण एका निष्पाप निरागस अपत्याला जन्म दिला आहे आणि त्याला निराधार करण्याची परवानगी तुम्हाला नाही हे तरूण मुला मुलींच्या लक्षात आले पाहिजे. आज हे लिहीतांना समाज पुढारला आहे की अति प्रमाणात पुढारला आहे असे वाटते पण एकमेकांना समजून घेणे, मन मोठे करून समोरच्या व्यक्तीला माफ करणे, यासाठी खूप धैर्य लागते. मुला-मुलींनो हे जग खूप सूंदर आहे. पुढच्या पिढीला ते अजून सुखकर, सुंदर करण्याची जिम्मेदारी मागची पिढी आपसूकच देणार आहे. ती जिम्मेदारी तुम्ही व्यवस्थित पार पाडाल या खात्रीने सांगण्याचा प्रयत्न करत आहे.

देवाच्या दारी दर्शन घ्यायला जायचं तर नतमस्तक व्हायला हवे तसं संसार करत असतांना संसाररुपी स्वर्गात आपण परस्परांना भलेही देवाचा दर्जा नाही दिला तरी एक माणूस म्हणून तरी एकमेकांना आदरपूर्वक वागवावे. येलम समाजच नाही तर प्रत्येक समाजात हा प्रश्न सतावत आहे पराकोटीला गेला आहे.

आज या लेखाच्या निमित्ताने मी हे मनोगत लिहिले आहे. कुणाच्याही भावना दुखावण्याचा हेतू नाही, जर नकळत कुणाच्या भावना दुखावल्या गेल्या असतील तर त्यासाठी क्षमस्व.



ॲड. शुभदा रेड्डी
मो. क्र. ९९२३० २२१११

# स्पर्धा परीक्षेसाठी सज्ज होताना..

'स्पर्धा':हा शब्दच खूप काही सांगून जातो. खरंतर स्पर्धेतूनच खरी गुणवत्ता बाहेर पडत असते. तुमचं नाणं खणखणीत आहे. हे स्पर्धा परीक्षेच्या माध्यमातून जगाला दाखवून देता येतं. त्यामुळे आजकाल प्रत्येकाला स्पर्धा परीक्षेची तयारी करावी वाटते. आणि हो, त्यात चुकीचे असे काहीही नाही. सरकारी नौकरीत मिळणारी सुरक्षितता, मिळणारा मान-सन्मान, नौकरीच्या माध्यमातून करायला मिळणारी समाजसेवा. हाती असलेल्या अधिकारांचा वापर करून लोकांचे जगणे अधिक सुसह्य करता येणे. अशा अनेक गोष्टींमुळे युवा पिढीचा या क्षेत्राकडे कल वाढत चालला आहे.




सोबतच इतर क्षेत्रामध्ये नोकरीच्या मंदावलेल्या संधी हेही एक कारण आहेच म्हणा. त्यात अनेक विद्यार्थ्यांच्या पालकांनाही असे वाटते की, आपल्या पाल्याने सुद्धा या परीक्षांमध्ये आपला हात आजमावून पहावा. मित्रांनो, यात गैर काहीही नाही. फक्त स्पर्धा परीक्षेची तयारी सुरु करण्याआधी काही गोष्टी विद्यार्थ्यांनी तसेच पालकांनी जाणून घेणे अतिशय महत्वाचे आहे.

असे म्हटले जाते की, एखाद्या गोष्टीची सुरुवात करून नंतर त्यावर विचार करण्यापेक्षा, ती गोष्ट सुरू करण्याआधी त्याबाबत सर्व बाबींचा विचार करणे अधिक महत्वाचे असते. एकदा का तुम्ही या स्पर्धेत उतरलात की, मग तुम्हाला या स्पर्धेत टिकवून ठेवण्यासाठी तुमच्या घरच्यांची सुद्धा खरी कसोटी लागते. त्यामुळे ही स्पर्धा नेमकी आहे तरी कशी..? या स्पर्धा परीक्षेचे मूलभूत स्वरूप, सर्व पैलू जाणून घेऊनच या क्षेत्रामध्ये उतरणे अधिक संयुक्तिक ठरेल.

**आतला आवाज**

सर्वप्रथम आपल्याला या परीक्षेची तयारी का करायची आहे..? या प्रश्नाचं आपल्याकडे नेमकं उत्तर असलं पाहिजे. या संदर्भात जर का, आपलं स्वतः चं असं उत्तर असेल. तर मग स्पर्धा परीक्षेच्या तयारीला सुरुवात करायला हरकत नाही. याचं मुख्य कारण म्हणजे, कोणी दुसरं एखादं तयारी करत आहे म्हणून तयारी करणे. किंवा एखाद्याने सांगितले आहे

म्हणून तयारी करणे. किंवा एखादा मित्र या परीक्षेत पास झाला आहे म्हणून तयारी करणे या पेक्षा स्वतःच्या क्षमता ओळखून स्पर्धा परीक्षेत उतरणे कधीही अधिक योग्य. आपल्या Strength, Weakness, opportunity आणि threat ओळखणे. ज्याला इंग्रजीत SWOT Analysis करणे असेही म्हटले जाते. या माध्यमातून आपल्यातील कमतरता,आपल्याला असलेल्या संधी आणि क्षमतांची योग्य जाणीव होण्यास मदत मिळते. तसेच परीक्षा पद्धती समजवून घेऊन, आपला आतला आवाज काय सांगतोय हे पाहूनच या क्षेत्रात पदार्पण करणे म्हणजे यशाच्या दिशेनं टाकलेलं पहिलं पाऊल असेल.

**पालकांची भूमिका**

स्पर्धा परीक्षांच्या तयारी दरम्यान पालकांची भूमिका अतिशय महत्त्वाची असते. त्यामुळे त्यांना या परिक्षेबद्दल पूर्णपणे अवगत करावे. त्यांना विश्वासात घेणे गरजेचे असते. परीक्षेचा आवाका, स्पर्धा परिक्षेच्या प्रक्रियेत साधारण किती वेळ लागेल यासंदर्भात पालकांना एक कल्पना दिली पाहिजे. या क्षेत्रात अनिश्चितता खूप असल्याकारणाने तसं त्याची पालकांना वेळीच जाणीव करून दिली पाहिजे. म्हणजे आपल्याला एखाद्या वेळेस यश मिळण्यास वेळ लागत असेल. तेव्हाही त्यांचा आपल्याला पाठिंबा मिळण्यास अडचण येणार नाही. आम्ही वाट्टेल ते करू पण आमच्या पाल्ल्याने स्पर्धा परीक्षेत यश मिळवले पाहिजे अशी अनके पालकांची अपेक्षा असते. परंतु आपल्याला जे काही मिळते ते केवळ आपण केलेल्या कष्टाच्या प्रमाणातच. त्यामुळे पालकांनी आपल्या पाल्ल्याला नेहमी अभ्यासासाठी प्रोत्साहित केलं पाहिजे. तरच तो मानसिकरित्या अधिक तंदरुस्त राहून चांगला अभ्यास करू शकेल.

**परीक्षेचे बदलते स्वरूप**

महत्वाचं म्हणजे, या परीक्षेचे स्वरूप आणि परीक्षेचा आवाका समजून घेणे अतिशय गरजेचे आहे आहे. नुकत्याच झालेल्या नवीन बदलानुसार राज्य सेवा मुख्य परीक्षेत आता आता लेखीला जास्त महत्व प्राप्त झाले आहे. त्यामुळे अभ्यासाचा आवाका आता वाढवावा लागणार आहे सोबतच लेखनाचा खूप सराव ही करावा लागेल. तसेच एमपीएससीच्या काही इतर परीक्षांचे स्वरूप आजही वस्तुनिष्ठ स्वरूपाचे आहे. त्यामध्ये दिलेल्या पर्यायांपैकी एक योग्य पर्याय निवडायचा असतो. त्यामुळे अशा वेळी परीक्षार्थींचा नेमका अभ्यास असला पाहिजे. या स्पर्धा परीक्षा तसेच शालेय, माध्यमिक आणि विद्यापीठ स्तरावरील परीक्षांमध्ये मोठा फरक असतो. तो फरक आधी समजून घेणे महत्वाचे आहे. स्पर्धा परीक्षांचे विविध टप्पे असतात. त्यात पूर्व परीक्षा, मुख्य परीक्षा आणि मुलाखत आणि काही पदांसाठी शारीरिक चाचणी. हे सर्व टप्पे टप्प्या-टप्याने पार करत जाणे गरजेचे असते. एक वेळेस पूर्व परीक्षा पास झालात आणि

मुख्य परीक्षेत अनुत्तीर्ण झालात तर पुढच्या वेळेस पुन्हा पूर्व परिक्षेपासून तयारी सुरू करावी लागते. असा प्रकार इतर महाविद्यालयीन परिक्षांबाबत नसतो. तसेच इथे नकारात्मक गुणांकन पद्धतीचा अवलंब केलेला असतो. त्यामुळे इथे चुकीला माफी नसते. एकदा परीक्षेचे स्वरूप लक्षात आले आणि आयोगाला उमेदवारांकडून काय अपेक्षित आहे हे, जर का लक्षात आले तर ही परिक्षा उत्तीर्ण होणे तेवढे अवघड नक्कीच नाही.

**अभ्यासाची दिशा**

आपल्याला कोणत्या परीक्षेचा अभ्यास करावयाचा आहे हे आधी ठरवणे. स्पर्धा परीक्षेत सरळ सेवा ते राज्य सेवा अशा विविध परिक्षा असतात. स्पर्धा परीक्षेच्या तयारीचा पहिला टप्पा म्हणजे आयोगाच्या संकेत स्थळावरून परीक्षेचा आयोगाने विहित केलेलला अभ्यासक्रम (ीूश्रश्रर्लीी) डाऊनलोड करणे. आणि तो सविस्तरपणे अभ्यासणे. पूर्वी झालेल्या परीक्षांचे पेपर वेबसाईट वर उपलब्ध असतात. अथवा दुकानात त्याची पुस्तके मिळतात. ते घेऊन त्याचे पद्धतशीरपणे विश्लेषण (अपरश्रूीळी) केले पाहिजे. एमपीएससीच्या अभ्यासासाठी स्टेट बोर्डाचे ६ ते १२ वी पर्यंतचे पुस्तके बारकाईने वाचणे गरजेचे असते. त्यातूनच मूलभूत संकल्पना स्पष्ट होण्यास मदत मिळते. आणि आयोगाचा मूलभूत संकल्पना वरच जास्त भर असतो. सोबतच छउएठढ ची पुस्तके सुद्धा महत्वाची आहेत. आयोगाच्या मागच्या वर्षांच्या विविध प्रश्नपत्रिका पाहिल्यास या पुस्तकांमधून अनेक प्रश्न येत असल्याचे आपल्याला दिसून येईल. विषयानुसार प्रमाणित संदर्भ साहित्याची निवड करून त्याचे पुन्हा-पुन्हा वाचन करावे.

अनेक पुस्तके वाचण्यापेक्षा एक पुस्तक अनेक वेळा वाचण्याने परीक्षेत अधिक फायदा होतो. असे स्पर्धा परीक्षेचे अनेक जाणकार सांगतात. स्पर्धा परीक्षेची तयारी करणाऱ्या उमेदवारांनी एक मराठी व एक इंग्रजी वर्तमानपत्र नियमितपणे वाचावे. त्यामुळे चालू घडामोडींबाबत आपण अद्यावत राहतो. स्पर्धा परीक्षांमध्ये चालू घडामोडींना अतिशय महत्व असते. तसेच एक चांगले मासिक नियमित वाचावे जसे की, परिक्रमा, तसेच लोकराज्य, इत्यादी. जेणेकरून वर्तमानपत्रातून आपले काही वाचायचे राहून गेले असल्यास ते मासिकाच्या माध्यमातून आपल्या वाचनात येईल. स्पर्धा परिक्षेच्या अभ्यासासोबत अवांतर वाचन ही खुप महत्वाचे आहे. आपल्या व्यक्तिमत्वाच्या जडणघडणीसाठी ते खूप गरजेचे आहे. त्याचा मुलाखतीच्या टप्प्यावर विशेष फायदा होतो. सोबतच नियमितपणे नकाशावाचन (ओींश्ररी) सुद्धा केले पाहिजे. यावर परीक्षेत हमखास प्रश्न विचारले जातात. एकदा वाचलेल्या घटकांची पुन्हा-पुन्हा उजळणी करणे गरजेचे असते. कारण एकदा वाचलेलं सहसा लक्षात राहत नाही. वर्तमानपत्र वाचताना त्यातलं काय वाचावं यापेक्षा काय वाचू नये हे जेव्हा आपल्याला कळेल तेव्हा आपण अर्धी परीक्षा पास झाल्यात जमा असतो. करण अनेकजण वर्तमानपत्र वाचण्यात खूप वेळ घालवतात. परीक्षेच्या दृष्टिकोनातून त्यातला मोजकाच भाग महत्वाचा असतो. तो महत्वाचा भाग कोणता आहे. हे आपल्याला समजले पाहिजे.

आपण तयारी करत असलेल्या परीक्षेचा पूर्ण अभ्यासक्रम (ीूश्रश्ररलीी) तोंडपाठ असेल तर ते समजणे अतिशय सोपे जाते. वर्तमानपत्रे तसेच पुस्तके वाचताना काढलेल्या नोट्स परिक्षेच्या काळात अतिशय उपयोगी ठरतात.त्यामुळे शक्य असल्यास अशा नोट्स काढाव्यात. तसेच झखइ , णपरलरवशू, चींीपरश्रे.ीस , झठड.जीस , तसेच अनेक सरकारी विभागांच्या वेबसाईटस सातत्याने बघत राहिले पाहिजे. त्यावर परीक्षेला उपयोगी पडण्यासारखी खूप माहिती असते. रेडिओवरच्या नियमितपणे बातम्या तसेच संवाद चर्चा ऐकल्यामुळे अनेक विषयांसंदर्भातील आपल्या
संकल्पना स्पष्ट होण्यास मदत मिळते. अभ्यास करताना विद्यार्थ्यांनी विषयाला धरून त्या अनुषंगाने अभ्यास करणे गरजेचे असते. आपल्या एखाद्या विषयातल्या संकल्पना स्पष्ट नसतील तर त्यासाठी आपण आपल्या एखाद्या मित्राकडून किंवा एखाद्या चांगल्या क्लासची मदत घेऊन वेळीच त्या संकल्पना समजवून घेणे अधिक योग्य.

**योग्य मार्गदर्शन**

असे म्हटले जाते की, **Books are like the {lane, the train and the road.T>hey are the destination and the journe.** त्यामुळे स्पर्धा परीक्षेची तयारी करण्यास सुरुवात करताना योग्य पुस्तके निवडणे महत्वाचे असते. त्यामुळे या क्षेत्रात पुरेसा अनुभव असलेल्या व्यक्तींचे मार्गदर्शन तसेच नुकतंच पास झालेल्या मुलांचेही मार्गदर्शन खूप महत्त्वाचे ठरते. यु-ट्यूब वर अनेक यशस्वी मुलांनी मार्गदर्शन केलेले व्हिडिओ उपलब्ध आहेत. त्याचा नक्कीच फायदा होऊ शकतो. कारण नुकतंच पास झालेल्या मुलांना परीक्षा पास होण्यासाठी नेमक्या कोणत्या गोष्टींची गरज असते हे त्यांनी नेमकं ओळखलेलं असतं. त्यामुळेच ते त्या परीक्षा पास झालेले असतात.

सोबतच अभ्यासासाठीचे वातावरण हा घटक सुद्धा अतिशय महत्वाचा आहे. त्यामुळे आपला अभ्यास होईल अशाच ठिकाणाची अभ्यासासाठी निवड करावी. आजकाल ग्रुप चर्चांचा देखील अभ्यासात फायदा होताना दिसतो. पण ग्रुप मधील सर्व मेंबर हे परीक्षेबाबत तेवढेच गंभीर असले पाहिजेत. अन्यथा ग्रुप चर्चा भरकटत जातात. थोडा रिकामा वेळ भेटल्यास संसद टीव्ही वरील महत्वाचे चर्चासत्र, राज्यसभा टीव्ही ने तयार केलेली संविधान नावाची सिरीज, प्रधानमंत्री सिरीज तसेच 'भारत एक खोज' असे काही विशेष कार्यक्रम अवश्य पहिले पाहिजेत.

**परीक्षेकडे बघण्याचा दृष्टिकोन**

इंग्रजीत एक म्हण आहे 'If you fail to {lan, {lan to fail'. त्यामुळे या परीक्षेचे, अभ्यासाचे सुयोग्य नियोजन केले पाहिजे. आणि त्याचे काटेकोरपणे पालन होणे ही होणे गरजेचे आहे. स्पर्धा परीक्षेत आपण इतर कोणाशी तरी स्पर्धा करतोय असे आपणास नक्कीच वाटत असते. परंतु प्रत्यक्षात इथे आपली स्वतःशीच सर्वात मोठी स्पर्धा सुरू असते. स्वतःच्या व्यक्तिमत्वाची चौफेर जडणघडण होण्यासाठी सातत्यपूर्ण अविश्रांत परिश्रम घेत राहणे गरजेचे असते. ही परीक्षा केवळ पास व्हायचंय म्हणून अभ्यास करण्यापेक्षा आपण करत असलेल्या अभ्यासाचा उद्या अधिकारी म्हणून काम करताना उपयोग होईल असा दृष्टिकोन ठेवून अभ्यास केल्यास, अभ्यास कधीच कंटाळवाणा वाटणार नाही. आणि कधीच विसरणारही नाही. अभ्यास करत असताना कोणत्या गोष्टींसाठी किती वेळ द्यावा. त्यात सोशल मीडिया आलाच, हे सर्वस्वी आपल्या स्वतः वर अवलंबून आहे. काहीतरी विधायक घडण्यासाठी, काही गोष्टींचा, काही काळासाठी, त्याग करणे कधीही चांगलेच. स्पर्धा परीक्षेची तयारी करू इच्छिणाऱ्यांनी सतत सकारात्मक दृष्टिकोन ठेवून स्मार्ट अभ्यास आणि त्यात सातत्य ठेवले पाहिजे.

**समजून अभ्यास करणे ही, जेव्हा आपली रोजची सवय बनून जाईल.**
**तेव्हा स्पर्धा परीक्षेतील यश आपल्यापासून जास्त दूर असणार नाही.**



शिकुमार राम चन्नागिर, पुणे.
बी. कॉम, एम. ए, नेट, एम. एस. डब्लू,
पीजीडीएमएम, टी.ओ.टी, एल.एल.बी
संहिता लेखक व अतिथी व्याख्याता म्हणून कार्यरत.
मो. नं. ९१३०८२२५८८

# ‘ती...!’



ती......म्हणजे नक्की कोण?

हो तिच ती जिने पदराखाली घेतल की लेकरू शांत झोपी जात, हो तिच ती जि लहानपणी रक्षाबंधनाला सळर्षी वरून भांडते मात्र सासरी गेली की भावाची चातकासारखी वाट पाहते, 'हो तिच ती जि नातवावर 'शुभं करोति' चे संस्कार करते, आणि हो तिच ती जिच्या प्रेमाची,त्यागाची फोडणी संसाराला चविष्ट बनवते. ' 'ती' ला पूर्णविराम कधी नसतोच असतो तो फक्त स्वल्पविराम.......!
कारण ती अखंड तेवत असते समईतल्या वातेसारखी.....!
अस असूनही ती कधी गर्भातच खुडली जाते तर कुठे ॲसिड हल्ला तीची वाट पाहत असतो. इच्छेविरुद्ध विवाह, हुंड्यासाठी जाळपोळ, कौटुंबिक हिंसाचार, कामावर लैंगिक शोषण...... अशा कितीतरी अडचणी ओलांडून दैनंदिन जीवन ‘ती’ ला जगाव लागत.

मुलगा वंशाचा दिवा आणि फक्त मुलगीच घराची प्रतिष्ठा या बुरसटलेल्या सामाजिक विचारसरणीतून प्रतिष्ठा जपणुकीच्या नावाखाली स्त्री दास्यत्व खऱ्या अर्थाने जन्म घेते.मात्र आता शिक्षणप्रसारामुळे ही परिस्थिती बदलते आहे कारण ‘ती’ ला स्वतःच्या हक्कांची जाणीव झाली आहे. शासनाने पारित केलेले विविध कायदे, पोलिस, विविध सामाजिक संघटना ही स्त्री स्वातंत्र्य जपणुकीत महत्त्वाची भूमिका बजावत आहेत.सर्व क्षेत्रांमध्ये असणारा तिचा वावर तिच्यातील क्षमता सिद्ध करणारा आहे. पुरुषांप्रमाणे तिलाही जन्मतः अधिकार प्राप्त होतात आपण ते देणारे कोणीतरी आहोत हा आव आणण्याची मुळीच गरज नाही, गरज आहे फक्त ‘ती’ ला समजून घेण्याची, तीचा आदर करण्याची, तीला प्रोत्साहन देण्याची.

स्त्री फक्त उपभोगाची वस्तू किंवा गुलाम नसून तीलाही स्वतंत्र आस्तित्व आहे हे स्वीकारण्याची.
फक्त जागतिक महिला दिनी शब्दबंबाळ भाषणे करण्यापेक्षा एक कृती केलेली बरी...... हो ना !



निलेश आरडले
मो. क्र. ८६२४०९८५४४

# येलम-रेड्डी समाज - ( काल, आज आणि उद्या )

बांधवांनो, आपला समाज हा मुळात शेतीप्रधान व शेतकरी समाज आहे. पुर्वीच्या काळात आपला समाज फक्त शेतीवर अवलंबून होता. तेंव्हा आपल्या सर्वच बांधवाकडे कमी जास्त प्रमाणात शेती होती व कष्टाने शेती करून चांगला संसार करण-ारा समाज म्हणून आपली ख्याती होती. बांधवानो कालांतराने शेतीचे विभाजन होत गेले व आपल्यातील बरेच बांधव अल्पभूधारक व भुमीहीन होत गेले.

त्याच बरोबर समाजातील मुला-मुलींनी शिक्षणाकडे लक्ष देण्यास सुरूवात केली, आमच्या बरोबरच्या अनेक बांधवांनी शिक्षणात प्राविण्य मिळवून मागच्या ३०-३५ वर्षांपूर्वी गावं सोडली व नोकरी-धंदा करत शहारात आपलं बस्तान बसविलं. बांधवानो हा मधला काळ गावातून शहरात येणाऱ्यांसाठी चांगला होता पण आता त्यात बदल झालाय. आता नविन लोकांना शहरात आपले बस्तान बसविणे म्हणावं तेवढं सोपं राहीलं नाही. आज शहरात सर्वच क्षेत्रात प्रचंड स्पर्धा सुरु आहे आणि म्हणूनच आपल्या देशातील सरकारचा भविष्यात गावं व तालुके सुधारण्याकडे कल असणार आहे व ती काळाची गरजही आहे.

बांधवांनो आपला समाज मुळातच कष्टकरी समाज असल्यामुळे आपण भविष्याची चिंता करण्याची गरज नाही पण उच्च शिक्षणासोबत चांगले गुण तसेच कष्टाची जोड दिली व सतत प्रगती होण्यासाठी चांगल्या सवई, चांगली संगत व पहाटे ऊठून दिवसातील १२ तास काम जर केलं तर यश काल, आज आणि ऊद्याही आपल्या समोर लोटांगण घालेल, हे मी माझ्या स्व अनुभवावरून सांगतोय.

बांधवांनो येणाऱ्या काळात देशातील सर्वचजण आल्पभुधारक किंवा भूमिहीन होणारच आहेत. त्यासोबत आपणही आहोत त्यामुळे उपजिवीकेसाठी व्यवसाय व व्यवसायासाठी कष्ट हे कुणालाही चुकणार नाहीत. तर मग चला आजपासून आपण फक्त आणि फक्त चांगलं व समाजासोबत आपल्याही हिताचं सत्य बोलणं, नियमित व्यायाम करणं, दररोज लवकर ऊठने व ईमानदारीने १२ तास कष्ट करण्यास सुरूवात करूयात यातच देशाचं, समाजाचं व स्वतःचंही हीत सामावलं आहे व सर्वांच्याच चांगल्या भविष्यासाठी व पुढील पिढीसाठी हे अत्यंत गरजेचे आहे.

धन्यवाद.

# निर्णय

आयुष्यातले निर्णय चुकतात,
आणि मग आयुष्यच चुकत जाते....

कधी कधी तर प्रश्नच कळत नाहीत,
आणि मग उत्तर ही चुकत जाते....

सोडवताना वाटते सुटत जातो गुंता,
पण प्रत्येक वेळी ऐक नवीन गाट बनत जाते...

दाखवणाऱ्याला वाट माहित नसते,
चालणाऱ्याचे धेय्य मात्र हरवून जाते....

काही गोष्टी वाटतात तितक्या सोप्या नसतात,
अनुभव म्हणजे काय हे तेव्हाच कळते,

जेव्हा एखादी ठेच काळजाला लागते....!



विठ्ठल बालाजी मरे
मो. क्र. ७४४७५५९९२२

# खेळाचे विश्व करेल आपल्याला समृद्ध

आजच्या धावत्या धकाधकीच्या महामारीच्या आधुनिक युगात खेळाचे महत्व हे अनन्यसाधारण आहे. खेळाच्या माध्यमातून मानवाचा शारीरिक आणि व्यक्तीमत्व विकास झपाट्याने होण्यास मदत होते व मनुष्य मानसिक दृष्ट्या सद्रढ बनु शकतो. खेळ एक अशा प्रकारचे माध्यम आहे की, ज्यामुळे एकमेकांची खूप लवकर ओळख निर्माण होते.

भगवान श्रीकृष्णाने आपल्या संवगड्या सोबत वेगवेगळ्या प्रकारचे खेळ खेळले आहेत. 'चेंडू, लगोरी, विटी-दांडु नानापरी खेळ मांडियेला यमुनेच्या तीरी' तसं आज पाहायला गेलं तर असंख्य प्रकारचे खेळ अस्तित्वात आहेत. जसे की कबड्डी, खो-खो, रनिंग, बॉक्सिंग, बॅडमिंटन, टेनिस, फ़ुटबॉल हॉकी, क्रिकेट हे प्रमुख खेळ आजही खुप लोकप्रिय आहेत आणि काळाच्या ओघात या खेळाची लोकप्रियता ही दिवसेंदिवस वाढतच चालली आहे.




समस्त जगातील लोकांच्या आनंदी जीवनात क्रिकेटचे मोठे योगदान आहे. भारतीयांचा तर हा सर्वाधिक आवडता खेळ आहे. भारतीयांचे जीवन तर क्रिकेट ने नेहेमीच आनंदी केले आहे. जीवन असो वा क्रिकेट या दोन्हीत संघर्ष अटळ आहे. काळ आणि अनेक लोक बाद करायला तत्पर असणारच पण तरीही न थांबता, कायम दक्ष राहून जीवनात लढावेच लागेल. यश मिळवावेच लागेल तरच जगाला तुमची आठवण राहील.

सुनील गावस्कर यांच्या कवितेमधुन क्रिकेट विषयी सविस्तर वर्णन
आपल्याला खूप काही सांगून जातं...

या दुनियेमध्ये थांबायाला वेळ कोणाला ?
हे जीवन म्हणजे क्रिकेट राजा, हुकला तो संपला!

अफ्फाट ऐशा मैदानी तू येशी वेळोवेळी
डाव तुझा येताच तू जमविशी आपुली खेळी

काळ करी बघ गोलंदाजी, संकट चेंडू फ्फेकी
भवताली तव झेल घ्यावया जोतो फ्फासे टाकी

मागे टपला यष्टीरक्षक तुझा उधळण्या डाव
ह्या साऱ्यांना चकवशील तर मिळेल तुजला धाव

चतुर आणि सावध जो जो, तोच इथे रंगला
हे जीवन म्हणजे क्रिकेट राजा, हुकला तो संपला!

तू ऐकत असता जयघोषाचे नारे
या कालगतीचे नकोस विसरू वारे

फ्फटकार अचूक तू चेंडू हया काळाचा
आयुष्य असे रे डोंगर जणू धावांचा

निरंतर राहील तुझी आठवण इथल्या कणाकणाला
हे जीवन म्हणजे क्रिकेट राजा, हुकला तो संपला!

खेळ खेळत राहूया, आनंददायी जीवन जगूया..



अभंग नामदेव चन्नागिरे
मो. क्र. ८८३००७७९३६

# ||प्रतिपंढरी||

चला चला आपण
पानगावी जाऊ
पंढरीच्या विठुरायाच
प्रतिबिंब पाहू||

मनभरून येते
पाहुनीया शिल्प
मंदिराच्या रचनेचे
गूढ आहे कल्प||

ठाव कसा घ्यावा
धरणी गे आई
पाया किती भक्तीने
रुजलेला बाई||

नाकी डोळे नीटास
आहे मूर्ती साजिरी
मनामध्ये साठवूया
प्रतिपंढरी गोजिरी||



||पांडुरंग||

आयुष्यात येऊनिया
मनोभावे यावे
प्रतिपंढरी येऊनि
जीवन सार्थकी व्हावे||

लातूर जिल्ह्यातील
रेणापूर तालुका
पानगाव गावाला
मान पंढरीचा||

माऊलीचा गाव किती
आहे बाई प्रेमाचा
कस्तुरी सुगंध
दरवळ भक्तीचा||

सोनाली आरडले / गुडे, उस्मानाबाद

# समाज बांधणी

बांधवांनो, नेमकं आपला समाज कोणत्या दिशेने गेला पाहिजे. त्याची नवी ओळख कशी असली पाहिजे. त्यासाठी आपण आज काय करायला हवं, ते केलं तर, कुठं उद्या चालून आपल्या समाजाची ओळख बदलू शकेल. विखुरलेल्या समाजाचं जास्त काही होत नसतं. एकवटलेला समाज कुठल्या कुठे भरारी घेत असतो, हे आपण अनेक उदाहरणांवरून बघत आहोत.

तसं पाहिलं तर व्यक्तिगत स्तरावर समाजातील अनेक बांधव मोठे होत असतील, प्रगती करत असतील, मोठं नाव ही कमवत असतील पण एकंदरीत समाजाचं काय? हा प्रश्न कायम अनुत्तरित राहीला आहे, त्यामुळे चला या दिवाळी अंकाच्या माध्यमातून समाज मन जाणून घेऊया तसेच समाज बांधणीच्या कामाला लागुया.

आपल्या तरुणाईला चांगल्या मार्गावर घेवून जाण्यासाठी त्यांना अशा माध्यमातून प्रेरित करावं लागेल. चांगली मूल्य त्यांना समजावून दयावी लागतील. त्यासाठी समाज बांधणी आवश्यक आहे. आपल्या समाजाची चांगली मूल्ये कोणती आहेत. आपला समाज काय आहे. काय होता हे त्यांच्यात खोलवर रुजवावे लागेल. थोडक्यात थोडंच खा पण कष्टाचं खा. हे बिंबवावं लागेल.

आजघडीला आपल्या समाजात कार्यरत असलेल्या सर्व संघटनांना त्यांच्या पातळीवर आणि बाकी इतर समाज बांधवांना आप आपल्या व्यक्तिगत पातळीवर शक्य तेवढं काम करावे लागेल. आपण जिथं आहोत तिथं आणि आपण जेव्हा-केव्हा गावाकडे जातो तेव्हा विविध गावामध्ये जाऊन आपल्या तरुणाईला चांगल्या मार्गावर कसे घेऊन येता येईल, यासाठी प्रेरणादायी मार्गदर्शन करावे लागेल, ज्या माध्यमातून जमेल, जशी जमेल तशी सर्वांनीच समाज बांधणी यावर काम करावं लागेल. याआधी फक्त समाज बांधवांसाठी वाहून घेतलेला असा दिवाळी अंक सुरू करण्याचा कोणी उपक्रम समाजात हाती घेतला असेल नसेल याबाबत नेमकी माहिती नाही. परंतु जसं समजायला लागलं तेव्हापासून तरी असं काही बघण्यात किंवा ऐकिवात नाहीये. त्यामुळे चला एका चांगल्या कार्यात शक्य तेवढं योगदान देवूया. सर्व समाज बांधवांना दिवाळीच्या खूप - खूप शुभेच्छा.



तुळशीराम (राजू) नरहारे, काळेवाडी पुणे
( स्वयंसेवक - येलम-रेड्डी फाऊंडेशन )
मो. क्र. ९८५००२३२२३

# सावित्रीच्या लेकी

अक्षरांच्या अंधारातुनी
प्रकाशाच्या पाऊलवाटा
दावणारी तुच ती सखी
अबंज्ञ तुझ्या आज आम्ही
तुझ्या गं सावित्रिच्या लेकी ।।१।।

फेकण्या शेण चिखलाला
अंगावरती थुंकण्याला
न होते कुणी तेथ बाकी
अबंज्ञ तुझ्या आज आम्ही
तुझ्या गं सावित्रिच्या लेकी ।।२।।

तुझ्या आयुष्याच्या कुंभाने
त्याग समर्पण कर्माने
झालीस तुच आमची पाठीराखी
अबंज्ञ तुझ्या आज आम्ही
तुझ्या गं सावित्रिच्या लेकी ।।३।।

नमन तुझ्या गं शौर्याला
स्मरुनी तुझ्या औदार्याला
वंदितो तुझ्याच गं लेकी
अबंज्ञ तुझ्या आज आम्ही
तुझ्या गं सावित्रिच्या लेकी ।।४।।



नागनाथ (विलास) भरत चन्नागिरे
(D.Ed, B.Ed,M.Ed, DSM,SET, IN EDUCATION)
पदवीधर शिक्षक - केंद्र शाळा शिराळे तर्फे मलकापूर
ता. शाहूवाडी जि. कोल्हापूर
मो.नं. ८८३०७१७५५१४

## रेडडी बचत गटामुळे समाजाची आत्मनिर्भरतेकडे वाटचाल............

शतकभर मागे वळून पाहिले तर, यलम समाज हा कष्टकरी आणि वारकरी यांच्या संगमातून प्रसूत झालेला. शेतीत राबराबायचे आणि या काळया आईच्या कुशीतून उगवलेल्या अन्नाधान्यांनी समाजाला , देशाला समृध्द करायचे. आषाढी , कार्तीकीला खांदयावर पताका घेऊन विठ्ठलाच्या , संत ज्ञानेश्वरांच्या , संत तुकोबांच्या भेटीच्या ओढीने आपल्या संसारातून फुरसत मिळवायची आणि वारकरी बनून स्वतःला संपूर्ण भक्तीरसात नाहून घ्यायचे , हा ठरलेला नित्यक्रम...याचाच एक परिपाक म्हणुन यलम समाज एक कष्टकरी व धार्मीक समाजापैकी एक गणला जातो.

नांदगाव , चाकूर तालुक्यातील लातूर जिल्हयात येणारे साधारणपणे दीड हजार लोकसंख्येचे गाव. श्री. संत बाळासाहेब महारांचा वारसा लाभलेलं हे गाव. याच गावात २५ ते ३० टक्केच्या आसपास यलम समाजाची लोकसंख्या असेल. चारशे साडेचारशेच्या लोकसंख्येने असलेला हा समाज प्रामुख्याने शेतकरी . प्रत्येकाकडे कसन्याईतपत शेती आहे. ७० ते ८० उंबरा यलम समाजाचा या गावात आहे. आजही हा समाज एका दिलाने , एका मताने व एकमेकांना मदत करत , एकदुस-यांच्या सुख-दुखःला आपलसं करत गुण्यागोविंदाने राहत आहे.

२०१८ सालची दिवाळी...असेच एका ठिकाणी समाजाची तरूण मुलं एकत्र आलेली. गप्पा , चर्चा सुरू होत्या...त्या चर्चेत अनेक मुददे आले. त्यातच असाही सुर आला की आपल्या समाजाल शेती करण्यासाठी आर्थिक समस्या भेडसावत आहे. विनभरवश्याच्या शेतीला शाश्वत पैसा पाहीजे आहे. समाजाला शेती करण्यासाठी शेतीला लागणारी आयुधं पाहीजे तेंव्हा मिळत नाहीत किंवा इतर प्रापंचिक गरजा भागविण्यासाठी पैसा कोठून आणायचा हा त्यातला महत्वाचा प्रश्न होता. काहीजणांनी बॅंका , सावकार , टक्केवारी या सर्वांचे पर्याय समोर ठेवले. पण या सर्वात होणारी ससेहोलपट, कागदपत्रांची पूर्तता आणि त्यासाठी लागणारा भरमसाठ वेळ या सर्व समस्या कधीही सुटणं शक्य नव्हतं. त्यातुनच विचाराचा एक कांगोरा असाही समोर आला की आपला समाज हा बचत करणारा आहे. तेंव्हा सर्व समाजाचा मिळून एक 'बचत गट' स्थापन करायचा , प्रत्येक कुटुंबातून किमान एक तरी सदस्य त्यात घ्यायचा, प्रत्येक महिण्याला एक ठराविक रक्कम जमा करायची व ती जमा झालेली रक्कम अगदी कमी दराने नाममात्र कागदापत्रांची पुर्तता करत गरज असलेल्या समाज बांधवाला दयायची. ही कल्पना सर्वांना खुप आवडली.

या कल्पनेला प्रत्याक्षात उतरवण्यासाठी २०१८ च्याच दिवाळीत नोव्हेंबर महिण्यात एक वॉटसअप ग्रुप बनवला. प्रत्येक कुटुंबाशी संपर्क करण्यात आला. सर्व प्रकारच्या कायदेशीर बाबी पार पाडण्यासाठी बचत गटाला कायदेशीर रूप देण्यासाठी आपल्याच समाजातील बांधवांनी २०१४ साली याच गावात स्थापन केलेल्या 'सर्वोदय बहुउददेशिय सेवाभावी संस्था' नांदगाव या संस्थेचे सहाय्य घेण्यात आले. संस्थेअंतर्गत 'रेडडी बचत' गटाची स्थापना करण्यात आली. यलम समाजातील जवळजवळ साठ कुटूंबातील ७० सदस्य तयार झाले. प्रत्येक महिण्याच्या १० तारखेपर्यंत प्रत्येक सदस्याने प्रत्येकी ५०० रूपये जमा करण्यास सुरूवात झाली. आज घडीला ७८ सदस्य 'रेडडी बचत गटाचे झालेले आहेत. सुरूवातीला गटाचे कामकाज पाहण्यासाठी पहिले दोन वर्षे कोणतेही मानधन न देण्याचे ठरले होते पण आज घडील तीन सदस्यांना प्रत्येकी ५०० रूपये मानधन म्हणून दिले जाते तो खर्च गटाच्या खर्च खात्यला टाकला जातो. सर्व नियमावली बॉन्डवर लिहून सर्व सदस्यांच्या स्वाक्षरीने अपेडेव्हिट करण्यात आले. आज घडील २०१८ साली लावलेल्या रोपटयाचे वृक्ष होताना दिसत आहे. "समान फायदा समान वाटा" या नैसर्गिक न्यायतत्वावर आधारित सुरूवातीला २ टक्के व्याजदराने पैसे कर्जरूपाने देण्यात आले. आज घडीला हा व्याजदर १.५० टक्के करण्यात आलेला आहे. भविष्यात तो १ टक्के करण्याचा विचार गट करीत आहे. प्रत्येक महिण्याला आलेले व्याज समान स्वरूपात प्रत्येक सदस्यांच्या नावावर भांडवली खात्याला वर्ग केले जाते. यामुळे गटाचे भागभांडवल आज अखेर २६,००,००० ( सव्वीस लाखांवर) गेलेले

आहे. प्रत्येक महिण्याला ३७,००० (सदोतीस हजार) पेक्षाही अधिक व्याज जमा होते. आज पर्यंत फक्त चार वर्षात जवळजवळ ९,००,००० (नऊ लाख) रूपये व्याज जमा झाले आहे. असेच हे पुढेही वाढतच जाणार आहे. एकीकडे आपल्याच समाज बांधवांच्या आर्थिक समस्या सुटत आहेत आणि दुसरीकडे व्याजाच्या रूपात फायदाही होत आहे. प्रत्येक महिण्याला येणारी बचत व व्याज यामुळे गटाचे भांडवल मोठ्या प्रमाणात वाढत आहे. गरजा भागत आहेत . जवळजवळ सर्वच रक्कम गरजू सदस्यांना कर्ज रूपाने दिली आहे. एक कर्जरोखा, गटातीलच दोन जामिनदार व दोन ब्लॅक चेक एवढया साध्या, सरळ आणि अगदी सोप्या गोष्टिंची पुर्तता केली की झालं .सदस्यांना चेकव्दारे, ऑनलाईन किंवा ऑफलाईन पध्दतीने सदस्यांच्या मागणी नुसार कर्ज वाटप केले जाते. यासाठी लागणारा वेळ अत्यल्प असतो.

चालू सप्टेंबर २०२२ चा ताळेबंद

| अ.न. | बचत | कर्जवाटप | जमा मुद्दल | मिळालेले व्याज नफा दंड | खर्च | मागील शिल्लक | या महिन्यातील एकूण जमा | पुढील शिल्लक |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| 1 | 39000 | 100000 | 25000 | 37034 | 1500 | 1165 | 100698 | 698 |

आजअखेर ताळेबंद

| अ.न. | बचत | कर्जवाटप | मिळालेले व्याज नफा दंड | खर्च | आजअखेर शिल्लक भांडवल | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|
| 1 | 1755000.00 | 2536500.00 | 898085.50 | 93887.00 | 2537198.50 | |
| | मयत सभासद माफी | | | 22000 | चंद्रकांत गोपे | |
| | Tally | 2537198.00 | | | | |

आज आपल्या समाजाच्या आर्थिक गरजा गावपातळीवरच भागत आहेत. त्य पूर्ण होत आहेत. याचा मनस्वी आनंद आहे. **यातील सगळयात मोठा फायदा म्हणजे, " समाजाला बचतीची सवय लागलेली आहे. प्रत्येक महिण्याला न चुकता आपली बचत व व्याज जमा करतात."** हे सगळयात मोठे गटाचे यश म्हणवे लागेल. गटामार्फात आपल्या समाजातील बांधवांना खालील कारणासाठी प्राधान्यक्रमाणे कर्ज देण्यात येते.

१) दवाखाना २) शिक्षण ३) शेती ४) व्यवसाय ५) मळणी यंत्र ६) म्हैस खरेदी करणे. ७) बैलजोडी खरेदी करणे. ८) ट्रॅक्टर खरेदी करणे. ९) शेतीतील लागणारी आवजारे खरेदी करणे. १०) खत, बी खरेदी करणे .११) मोटारसायकल खरेदी करणे. १२) बोर घेणे १३) विहीर खोदणे १४) पाईपलाईन करणे. १५) गोठा बांधनी. १६) शेळी पालन, कुक्कुट पालन १७) मच्छी पालन करणे. १८) दुध डेअरी १९) मुलीचे लग्न किंवा मुलाचे लग्न २०) शेती खरेदी करणे. २१) जागा खरेदी करणे. व इतर दैनंदिन व प्रापंचिक आकस्मीक खर्चासाठी आर्थिक मदत केली जाते. त्याच प्रमाणे अनेक प्रकारचे शेती व्यवसायाला पुरक

असे व्यवसाय जेणेकरून आपल्याच बांधवाचे उत्पन्नाचे स्त्रोत वाढत जातील व आपला समाज आर्थिक रित्या आत्मनर्भर बनेल व समाज विकशीत होईल हीच या मागाची कामना.

प्रत्येक दिवाळीला होणा-या सहामाही सभेमध्ये (वर्षातून गटाच्या दोन जनरल सभा होतात. एक उन्हाळयात व दुसरी दिवाळीत) सर्व सदस्यांना **'दिवाळी भेट'** ही गटाच्याच फायदयातून वस्तूच्या स्वरूपातून दिली जाते. स्नेह भोजनाचा कार्यक्रम होतो. गटाच्या कार्यपध्दतीवर चर्चा होते. अहवाल मांडला जातो. ठराव मांडले जातात. आवश्यकतेनुसार बदल केले जातात. नवीन नियम तयार केले जातात. ते पुढील सहामाही सभेपर्यंत लागू राहतात त्यात कोणताही बदल होत नाही. या सर्व नियमांचे गटातील सर्व सदस्य अगदी काटेकोरपणे पालन करतात. हे सर्व घडतं ते लोकशाही पध्दतीने ...बहुमताने बहुमतांनी घेतलेला निर्णय सर्वजण अगदी मोटया मनाने स्विकारतात. गटाला आर्थिक रिस्क नको म्हणुन प्रत्येक सभासदांचा गटामार्फत विमा देखील काढला जातो.

खरच आज मला आनंद होतो आहे हे सांगताना, की आपला समाज एवढा विश्वासू आणि सत्याच्या मार्गाने चालणारा असल्यामुळे आजपर्यंत एकही समस्या निर्माण झाली नाही. आणि ज्या झाल्या त्या सर्वांनी मिळून सोडवल्या देखील. आज याच गटाचा आदर्श घेऊन गावात इतर समाजातील व्यक्तींनी एकत्र येत 'सर्वोदय' नावाचा गट स्थापन केला त्याचेही आज भांडवल ४० लाखांवार पोहचले आहे व पुण्यात देखील आत्मनिर्भर पुरूष व आत्मनिर्भर महिला अशा प्रकारचे गट स्थापन केलेले आहेत. खरच ही एक प्रकारची क्रांतीच म्हणावी लागेल. समाजाने एकत्र येऊन जर एखादे काम करायचे म्हटंले तर नक्कीच ते यशस्वी होते हे निश्चीपणे सांगता येईल.

भविष्यात आपल्या यलम समाजाची एक स्वतंत्र पतसंस्था स्थापन करून पुढे तिला यलम समाजच्या हक्काच्या बॅंकेत रूपांतर करण्याचा मानस आहे. त्यामुळे प्रत्येक गावागावात ही बचत गटाची संकल्पना पोहचावी. ही एक चळवळ बनावी . आपला समाज आर्थिकदृष्टया आत्मनिर्भर व्हावा हाच या मागचा प्रामाणिक हेतू. आज तरी मी हे निश्चितपणे सांगू शकतो की, रेड्डी बचत गटामुळे यलम समाजाची आत्मनिर्भरतेकडे वाटचाल सुरू आहे...........

सर्वांना दिवाळीच्या आनंत शुभेच्छा!

धन्यवाद...........



नागनाथ (विलास) भरत चन्नागिरे
**(D.Ed, B.Ed,M.Ed, DSM,SET, IN EDUCATION)**
पदवीधर शिक्षक - केंद्र शाळा शिराळे तर्फे मलकापूर
ता. शाहूवाडी जि. कोल्हापूर
मो.नं. ८८३०७१७५५१४



# येलम-रेड्डी फाउंडेशन, पुणे



धन्यवाद!






श्रद्धास्थान



# बरुरे एंडोक्रायनोलॉजी & मॅटर्नीटी केअर

## उपलब्ध सुविधा

**मधुमेह**
- पुर्ण तपासणी
- आहार मार्गदर्शन
- पायाची काळजी

**थायरॉईडचे आजार**
- हायपो आणि हायपर

**तारुण्यात येतानाचे आजार**
- उशिरा, लवकर, कमी विकास

**वंध्यत्व**
- हायपोगोनॅडिसम

- कॅल्शियमचे आजार
- पिट्युटरी व ॲड्रीनल ग्रंथीचे ट्युमर व इत्तर आजार
- लठ्ठपणा
- वजन न वाढणे
- उंची वाढवणे
- पाळीचे आजार
- PCOD, चेहऱ्यावरील अन्यावश्यक केस
- हाडांचा ठिसुळपणा
- बाळाचे लिंग न समजणे
- सर्व प्रकारचे हार्मोनल इन्बॅलन्स

## उपलब्ध सुविधा

- प्रसुतीपुर्व व प्रसुतिपश्चात तपासणी
- वेदनारहीत प्रसुती
- पाळी नियमन
- पी.सी.ओ.डी.
- गर्भनिरोधक व गर्भपात सेवा
- कुटुंबनियोजन (दुबिर्णीद्वारे)
- वधत्व निवारण
  टेस्ट टयूब बेबी

- किशोरवयीन समस्या
- रजोनिवृत्ती सल्ला
- दुर्बिण शस्त्रक्रिया
  फायब्रॉइड, सिस्ट, एकटॉपिक, गर्भपिशवीचे ऑपरेशन
- काचपट्टी तपासणी
  PAP smear



स्थळ : बरुरे एंडोक्रायनोलॉजी & मॅटर्नीटी केअर, राठी टाऊन सेंटर, HDFC बँकेशेजारी, मेन रोड, लातूर मो. ८८८ ९९९ ३५४४

येलम-रेड्डी फाऊंडेशन, पुणे द्वारा संचलित

# येलम विश्व

### अंकाबाबत थोडक्यात...

येलम-रेड्डी फफ़ाउंडेशन संचलित ''येलम विश्व'' (पाऊलवाट समाजाची)
या नावाने आपण दिवाळी अंक सुरु करावा असा विचार मनात आला.
आणि या माध्यमातून आपल्या समाज जोडणीच्या कामाला अधिक बळ मिळेल
तसेच समाजात जे काही सकारात्मक / चांगलं घडत आहे त्याला प्रसिद्धी मिळून
ते आपल्या संबंध समाज बांधवांपर्यंत पोचू शकेल.
यासाठी दिवाळी अंकाचे प्रयोजन केले आहे.

दिवाळी अंक २०२२

येलम-रेड्डी फाऊंडेशन, पुणे - नोंदणी क्रमांक : महा / १२६१ / २०२० / पुणे, नोंदणी दिनांक : १५ / १२ / २०२० / पुणे
मदत मिळवण्यासाठी संपर्क करा - ९१३०८२२५८८, ८१२७१३२३२३, ९९७५०२१०५५, ९९२२५४४४४, ७९७२७००७०२
https://www.yellamreddyfoundation.com

